

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---


**संपादक :** प्र.ना. परांजपे
**संपादन-सल्लागार :** अशोक रा. केळकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१. **या अंकाचे मूल्य रु. २५/-**

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

# श्री. पु. भागवत : चोखंदळ प्रकाशक, आदर्श संपादक

प्र ना. परांजपे

श्री. पु. भागवतांच्या रूपाने मराठी नवसाहित्याला लाभलेला एक चोखंदळ प्रकाशक, आदर्श ग्रंथसंपादक आणि साक्षेपी समीक्षक काळाच्या पडद्याआड गेला आहे. त्यांची उच्च अभिरुची, मृदू भाषाशैली आणि आपल्या भावना अतिशय संयमाने व्यक्त करण्याचा त्यांचा स्वभाव या वैशिष्ट्यांमुळे जिवंतपणीच ते एक आख्यायिका बनले होते. त्यांच्या 'हं', 'ठीक आहे', 'कथा बरी आहे', 'कथेला टोक आलेले नाही', अशा विधानांबद्दल दंतकथा निर्माण झाल्या होत्या.

महाविद्यालयीन शिक्षण चालू असतानाच मौज मुद्रणालय, दैनिक 'प्रभात', मासिक 'सत्यकथा' आणि साप्ताहिक 'मौज' यांची जबाबदारी वि.पु. व श्री.पु. या भागवत बंधूंच्याकडे आली. त्यांच्या सुजाण प्रयत्नांमुळे देखणे मुद्रण व उच्च गुणवत्तेचे साहित्य यांचा 'समसमा संयोग' महाराष्ट्राला लाभला. त्या वेळी दुसऱ्या महायुद्धाचे अखेरचे पर्व सुरू झाले होते. 'चले जाव'ची चळवळ, नाविकांचे बंड अशा घटनांमुळे स्वातंत्र्याचे पडघम वाजू लागले होते. महागाई वाढत होती. मध्यमवर्गाची संख्या व प्रभाव वाढत होता. महाराष्ट्रातले सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक वातावरण ढवळून निघाले होते. नवे प्रश्न व नव्या संवेदना निर्माण होत होत्या. परिणामतः साहित्यक्षेत्रातही नवतेच्या आविष्कारांची चाहूल ऐकू येऊ लागली होती. या आविष्कारांचा शोध घेऊन आपल्या नियतकालिकांत त्यांना आवर्जून जागा देण्याचे, त्यांची जोपासना करण्याचे काम श्रीपुंनी केले. त्यांच्या या जपणुकीत आवेश नव्हता की आढ्यता नव्हती. जणू काही इतिहासाने हे काम आपल्यावर सोपवले आहे आणि आपण ते निष्ठेने केले पाहिजे, असा सहज समजूतदारपणा होता. मर्ढेकर, करंदीकर, पाडगावकर, इंदिरा संत इत्यादींच्या काव्याची त्यांनी पाठराखण केली; गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर, अरविंद गोखले, पु.भा.भावे अशा तरुण कथालेखकांची निगराणी केली. ना.सी.फडक्यांसारखे ज्येष्ठ, लोकप्रिय व प्रतिष्ठित साहित्यिक त्यांच्यावर तुटून पडले तेव्हा ते विचलित न होता त्यांच्या पाठीशी उभे राहिले - त्या रणधुमाळीत सहभागी न होता !

नियतकालिकांमधून प्रकट होणाऱ्या प्रतिभेच्या नव्या अंकुरांना आत्मविश्वास मिळावा, स्थायी रूप लाभावे म्हणून श्रीपुंनी आपल्या बंधूंच्या सहकार्याने मौज प्रकाशन गृहाची मुहूर्तमेढ १९५०मध्ये उभारली. तोपर्यंत संहितेच्या मुद्रणापूर्वी तिचे 'संपादन' करावे लागते ही कल्पना प्रकाशनक्षेत्रात रुजलेली वा रुळलेली नव्हती. लेखकाने लिहिलेली संहिता स्वीकारणे किंवा नाकारणे हे दोनच पर्याय प्रकाशकापुढे असतात; संहिता स्वीकारल्यास ती व्यवस्थित छापून घेऊन तिचे वितरण करणे एवढेच प्रकाशकाचे काम असते, असे त्या वेळी समजले जाई. त्या समजुतीला श्रीपुंनी छेद दिला. स्वीकारलेल्या संहितेतील सुप्त गुणवत्तेचा पूर्ण विकास व्हावा म्हणून ते लेखकाशी चर्चा करीत, सूचना करीत आणि त्या सूचना स्वीकारण्याचे किंवा नाकारण्याचे स्वातंत्र्यही लेखकाला देत. अशी चर्चा करणाऱ्या, सूचना देणाऱ्या पत्रांतून श्रीपुंची संवेदनशील, सहृदय व साक्षेपी समीक्षा प्रकट होई. अनेक लेखकांनी त्यांच्याबद्दल व्यक्त केलेली कृतज्ञता याची साक्ष देते.

श्रीपुंच्या ग्रंथसंपादनात ग्रंथनिर्मितीच्या प्रत्येक अंगाबाबतच्या जागरूक सौंदर्यदृष्टीचा व जाणकारीचा समावेश होता. कागदाची निवड, पुस्तकाचा आकार, टंकांची योजकता, मांडणीतील वेगळेपणा आणि अर्थवाही कलात्मक मुखपृष्ठ ही मौजेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांची वैशिष्ट्ये होती. कुशल संपादनामुळे पुस्तकाच्या गुणवत्तेत कशी व किती भर पडते हे श्रीपुंच्या संपादनामुळे लेखक, वाचक आणि प्रकाशक यांच्या लक्षात येऊ लागले. आता मराठीतील प्रकाशन-व्यवसायात पगारी किंवा मानधनाच्या अटीवर ग्रंथ-संपादकांची नेमणूक होऊ लागलेली आहे, याचे बरेचसे श्रेय श्रीपुंकडे जाते.

श्रीपुंनी केवळ ग्रंथसंपादनच केले नाही तर ग्रंथसंपादकाने पाळावयाच्या आचारधर्माचाही आदर्श निर्माण केला. लेखकाच्या आत्म-सन्मानाची व स्वातंत्र्याची ते कटाक्षाने जपणूक करीत. त्यांच्या सूचनाही अतिशय ऋजू भाषेत व अनाग्रही पद्धतीने केलेल्या असत. लेखकाबरोबरच्या चर्चेच्या गोपनीयतेवर त्यांचा कटाक्ष असे. इतरांबरोबरच्या खासगी संभाषणातही ते तिचा उच्चार होऊ देत नसत. त्यांच्या सूचना म्हणजे आपला अधिक्षेप आहे, असे सुरुवातीच्या काळात काही लेखकांना वाटत असावे. त्याबद्दल सुरवातीच्या काळात टीका, तक्रार व टिंगलही झाली. ठणठणपाळाने त्यांना सतत आपले लक्ष्य बनवले. त्यांच्या 'भागवत' या आडनावावरून कोट्या केल्या. 'मौज' व 'सत्यकथा' यांना 'मठ' व श्रीपुंना 'मठाधिपती' या पदव्याही दिल्या. पण हळूहळू त्यांची मन:पूर्वकता, आस्था, नि:स्वार्थ व व्यक्तिनिरपेक्ष असलेली साहित्यनिष्ठा लेखकांच्या लक्षात येत गेली आणि टिंगलटवाळीची जागा स्नेहशील विनोद, आदर व (पुढे पुढे) श्रद्धा यांनी घेतली.



अनुक्रमणिका

श्रीपु उत्तम वक्ता व विद्यार्थीप्रिय प्राध्यापक होते. पु.शि.रेग्यांची 'त्रिधा राधा', मर्ढेकरांची कविता, माधव आचवल, कुसुमावती देशपांडे, वा.ल. कुलकर्णी इत्यादी विषयांवरची त्यांची व्याख्याने श्रोत्यांच्या स्मृतिपटलावरून कधीही पुसली जाणार नाहीत. समकालीन समाजजीवनातूनच साहित्याचे पोषण होते याची त्यांना जाणीव होती. त्यांना 'कलावादी' म्हणून निकालात काढणाऱ्यांनी मौजेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांतील विविधता, गीता साने, गोदावरी परुळेकर, 'सोव्हिएत रशियाची पन्नास वर्षे', इत्यादी सामाजिक, आर्थिक, राजकीय आशयाची पुस्तके लक्षात घ्यायला हवीत. स्वतंत्र भारताच्या घडणीवर, समकालीन बौद्धिक प्रवाहांवर श्रीपुंचे सजग लक्ष असे. मौज-सत्यकथेत पुस्तकांबरोबरच नाटक, चित्रपट, संगीत, नृत्य, चित्रप्रदर्शने यांचीही परीक्षणे येत, कलाकारांच्यावर लेख येत. मौज-सत्यकथेतून व्यक्त होणारा व्यापक, समावेशक, उदार दृष्टिकोणच साठ व सत्तरच्या दशकांत महाराष्ट्रात 'प्रस्थापित' होता. म्हणूनच तरुण, सळसळत्या रक्ताची बंडखोरी 'सत्यकथे'च्या होळीमधून व्यक्त झाली !

श्रीपु गेले आणि एक कालखंड संपला. नवसाहित्याचे युग संपुष्टात आले !

(हा लेख लिहिण्यासाठी शरद गोगटे यांचे साहाय्य झाले आहे.)

■

**श्री. पु. भागवतांचे व त्यांच्यासंबंधीचे काही लेखन**

(१) गाडगीळांच्या कथा (संपादन व प्रस्तावना)

(२) साहित्याची भूमी (संपादक - वासंती मुझुमदार)

(३) श्री.पु. : व्यक्ती आणि संपादक (संपादक - वासंती मुझुमदार)

(४) जी.एं.ची पत्रे, खंड १ ते ४ (संपादन)

# डॉ. सरोजिनी वैद्य

**प्र. ना. परांजपे**

कॅन्सरसारख्या दुर्धर व्याधीशी चार-पाच वर्षे शर्थीची झुंज देऊन अखेरीस डॉ. सरोजिनी वैद्य यांची जीवनज्योत ३ ऑगस्टला शांत झाली. आपल्या वैयक्तिक व कौटुंबिक जीवनाप्रमाणे आपल्या आजारपणाबद्दल बोलणेही त्या कटाक्षाने टाळत. रुग्णालयातही आपल्याला 'बघायला' कुणी यावे हे त्यांना आवडत नसे. भेटायला आलेल्या व्यक्तीला आपल्या आजारपणाबद्दल कसे कळले याची त्या नातेवाइकांकडे खोदून चौकशी करीत व आपली नापसंतीही व्यक्त करीत. आपले ताणतणाव, कष्ट, यातना इत्यादी साऱ्या गोष्टी त्या ओठ मिटून व चेहेऱ्यावर स्मित खेळवीत सहन करीत.

त्यांच्या बुद्धिमत्तेमुळे, वक्तृत्वामुळे आणि आणि सततच्या हसतमुख, मनमिळाऊ वागण्यामुळे त्यांच्या वडिलांना त्यांचे फार कौतुक व अभिमान वाटे. त्यांचे भाऊ व वडील त्यांना घरातला 'मुलगा' मानत. पण त्या त्यांच्या पिढीच्या प्रातिनिधिक 'स्त्री' होत्या. करिअरमुळे घराकडे दुर्लक्ष झाले असा ठपका येऊ नये म्हणून धडपडणारी, दुप्पट कष्ट उपसणारी, सासर-माहेर दोन्ही सांभाळणारी ही पिढी. प्रसंगी आपल्या आवडी-निवडींना, महत्त्वाकांक्षांना मनातच दाबून ठेवणारी ही पिढी. आपणहून पत्करलेली बंधने झुगारली असती तर त्या पिढीतल्या इतर काही स्त्रियांप्रमाणे सरोजिनीबाई कितीतरी अधिक मोठ्या होऊ शकल्या असत्या. त्यामुळेच की काय, व्यक्तीचे कार्य व तिच्या मर्यादा अभ्यासण्यात, त्यातील कुटुंब व समाज यांची भूमिका समजावून घेण्यात सरोजिनीबाईंना विशेष रस होता.

स.प. महाविद्यालय (१९५७-६२), रामनारायण रुइया महाविद्यालय (१९६२-७२) आणि मुंबई विद्यापीठ (१९७२-९३) या नामवंत संस्थांत त्यांनी छत्तीस वर्षे मराठीचे अध्यापन केले. (फर्ग्युसन महाविद्यालयाचा विद्यार्थी असूनही मी १९५७-५८मध्ये त्यांच्या काही तासांना हजर राहिलो आहे. आणि १९६५ ते ७२मध्ये रुइया महाविद्यालयात मी त्यांचा सहकारी होतो) अध्यापन त्यांना मनापासून आवडे. त्यांच्या वक्तृत्वाला, बुद्धिमत्तेला व कसून केलेल्या चौफेर वाचन व अभ्यासाला त्यात पुरेपूर वाव मिळे. त्यांचे विद्यार्थी - विशेषत: विद्यार्थिनी - त्यांचे भक्त बनत. आणि

आपल्या या प्राध्यापिकेचे शक्य तितके अनुकरण करू लागत. सरोजिनीबाई विद्यार्थ्यांच्या मनाची, कुतूहलाची कवाडे उघडत आणि वाङ्मयाकडे व त्यातून दिसणाऱ्या समाजाकडे पर्यायाने सभोवतीच्या वास्तवाकडे - नव्या दृष्टीने पाहायला उद्युक्त करीत.

मुंबई विद्यापीठातील मराठी विभागाच्या प्रमुख बनल्यानंतर त्यांच्यातील प्रशासकीय व व्यवस्थापकीय गुणवत्तेला वाव मिळाला. विभागाला त्रासदायक ठरणाऱ्या व्यक्तीला योजनापूर्वक दूर करण्यापासून महत्त्वाच्या पण खर्चिक ग्रंथांच्या प्रकाशनापर्यंत अनेक बाबतींत त्यांची ही गुणवत्ता व्यक्त झाली. अरविंद मंगळूरकर व वि. मो. केळकर यांनी सिद्ध केलेली 'ज्ञानदेवी' अनेक संस्थांकडून आर्थिक साहाय्य मिळवून त्यांनी प्रकाशित केली, कृ.श्री. अर्जुनवाडकरांची व्याकरणावरची दोन पुस्तकेही प्रकाशित केली. विद्यापीठातील अन्य विभागांचे सहकार्य मिळवून 'वाङ्मयीन महत्ता' या विषयावरील दोन चर्चासत्रे त्यांनी आयोजित केली आणि त्यात वाचलेल्या निबंधांचे पुस्तकही प्रकाशित केले. या व अशा अन्य प्रकल्पांत संकल्पन, आयोजन, व्यवस्थापन व त्यातून फलस्वरूप पुस्तकांचे सर्वांगीण संपादन अशा विविध जबाबदाऱ्या कितीही कष्ट करावे लागले, वेळ द्यावा लागला तरी त्या विनातक्रार पार पाडीत. (रुइया महाविद्यालयातील त्यांचे विभाग-प्रमुख असलेल्या प्रा. वसंत बापटांचे उदाहरण त्यांच्यापुढे या बाबतीत असावे.) मराठी भाषा व वाङ्मय यांच्या अभ्यासकांना उपयुक्त ठरतील असे कोणते प्रकल्प आखता येतील आणि त्यातले कोणते प्रकल्प कसे पार पाडता येतील, याचा विचार त्यांच्या मनात सतत घोळत असे. त्यामुळे राज्य मराठी विकास परिषदेच्या पहिल्या संचालक बनल्यानंतर (१९९३-२००१) त्यांनी अनेक महत्त्वाचे प्रकल्प सुरू केले व पार पाडले यात नवल नाही.

विद्यापीठातील आणि शासनातील नोकरशाही काय व कशी काम करते याची त्यांना चांगली जाण होती. त्यामुळे त्यांच्याकडून कधी गोड बोलून तर कधी ठाम राहून कसे काम करून घ्यायचे, हे त्यांना माहीत होते. पण राज्य मराठी विकास संस्थेच्या सल्लागार मंडळातील काही पूर्वग्रहदूषित, हट्टी व कोत्या मनाच्या सभासदांमुळे त्यांना मनस्ताप होई, त्यांच्या योजनांचा वेग मंदावे; पण कार्यनाश टाळण्यासाठी त्या प्रसंगी माघार घेत किंवा तडजोडी करीत. आपल्या वैयक्तिक मानापमानापेक्षा कार्य महत्त्वाचे याची खूणगाठ त्यांनी मनाशी बांधलेली होती. त्यामुळे वैद्यकीय शब्दकोश, सूत व विणकाम यांविषयीचा शब्दकोश, कोशवाङ्मय यासंबंधीचे चर्चासत्र व त्यातील निबंधांचा संपादित ग्रंथ अशी अनेक महत्त्वाची कामे त्यांनी पार पाडली.

सरोजिनीबाई समीक्षक, ललित लेखक व संशोधक होत्या. 'माती आणि मूर्ती'

या त्यांच्या समीक्षालेखसंग्रहाच्या शीर्षकातही त्यांचा दृष्टिकोण स्पष्टपणे प्रतिबिंबित झालेला आहे. त्यांना फक्त 'मूर्ती'मध्ये रस नव्हता; ती मूर्ती ज्या मातीपासून बनली त्या मातीमध्येही तेवढाच रस होता. साहित्यकृतीरूपी मूर्तींची माती आणि व्यावहारिक जीवनातील चालत्या बोलत्या मूर्तींची माती यांमध्ये कोणते गुंतागुंतीचे संबंध असतात याचा शोध घेण्यात त्यांना रस होता. म्हणून साहित्यातील पात्रांना पडणारे प्रश्न त्या स्वत:ला पडणाऱ्या प्रश्नांशी पडताळून पाहात. त्यांच्या या दृष्टिकोणाचा, पडताळणीचा प्रभाव त्यांच्या संशोधनपर लेखनातही दिसतो. त्यांचे संशोधनपर लेखन पारंपरिक संशोधनलेखनाप्रमाणे 'स्व'-निरपेक्ष नाही. गोपाळराव हरी, रमाबाई, काशीताई, दिवाकर, शेजवलकर, वा.ब. पटवर्धन इत्यादींबद्दलच्या सरोजिनीबाईंच्या लेखनात तो काळ, समाज व ती व्यक्ती समजावून घेणाऱ्या सरोजिनीबाई वारंवार डोकावतात. त्यांना पडणारे प्रश्न त्या वाचकांसमोर ठेवतात. म्हणजे एक प्रकारे त्या स्वत:शीच संवाद करीत असतात. त्यामुळे त्यांचे संशोधनपर लेखनही आत्मपर ललित लेखनच ठरते. काही कर्मठ संशोधकांनी त्याबद्दल नाराजीही व्यक्त केली आहे.

'पहाटपाणी' व 'शब्दायन' हे त्यांचे ललितलेखनसंग्रह. त्यांची लयदार सुभग भाषा, संवेदनशीलतेने पण भावुक न होत घेतलेला वास्तवाचा (मग ते समकालीन असो की इतिहासकालीन !) वेध यांमुळे त्यांचे लेखन प्रसन्न व संस्कारशील वाचनाचा प्रत्यय देते. फक्त एक समीक्षा लेख-संग्रह व दोन ललितलेख-संग्रह पाहिले की सरोजिनीबाईंनी संशोधनाच्या रगाड्यात स्वत:मधील समीक्षकाला व ललित लेखकाला पुरेसा वाव न देता त्यांच्यावर अन्याय केला असे वाटत राहते.

सरोजिनीबाईंच्या पाच पुस्तकांना राज्य पुरस्कार मिळाले. त्याशिवाय शि.म. परांजपे पारितोषिक (महाराष्ट्र साहित्य परिषद), ह.स. गोखले पुरस्कार, (नगर वाचन मंदिर), सत्यशोधक पुरस्कार, सु.ल. गद्रे पुरस्कार, वाग्विलासिनी पुरस्कार, असे अनेक पुरस्कार व पारितोषिके त्यांना मिळाली. बडोदा वाङ्मयपरिषदेचे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले होते.

मराठी अभ्यास परिषदेच्या त्या सभासद व हितसंचक होत्या. महाबँक पारितोषिक वितरण कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानही त्यांनी भूषविले होते.

■





अनुक्रमणिका

## डॉ. सरोजिनी वैद्य यांची ग्रंथसंपदा

(१) संजीवनी मराठे यांची निवडक कविता (संपादन) (अनुपलब्ध)
(२) पहाटपाणी (१९७५)
(३) शब्दायन (१९८०)
(४) माती आणि मूर्ती (१९७५)
(५) गोपाळराव हरि (१९७८)
(६) काशीताई कानिटकर (संपादन) (१९८०)
(७) संक्रमण (१९८५)
(८) रमाबाई रानडे : व्यक्ती आणि कार्य (सहलेखन) (१९९०)
(९) नानासाहेब फाटक : व्यक्ती आणि कला (सहसंपादन) (१९८४)
(१०) ज्ञानदेवी (संपादन, प्रस्तावना) (१९९४)
(११) समग्र दिवाकर (संपादन) (१९९६)
(१२) वाङ्मयीन महत्ता (सहसंपादन) (१९९१)
(१३) टी.एस.एलियट यांचा काव्यविचार (संपादन)
(१४) इतिहासकार त्र्यं.शं. शेजवलकर : व्यक्ती आणि कर्तृत्व (संपादन)
(१५) कहाणी लंडनच्या आजीबाईंची (१९९६)
(१६) आठवणी काळाच्या आणि माणसांच्या
(१७) द.ग.गोडसे यांची कलामीमांसा (संपादन) (१९९७)
(१८) 'कवि आणि काव्योदय'कर्ते वा.ब. पटवर्धन (२०००)•
(१९) नाट्यछटाकार दिवाकर (प्रकाशनाच्या मार्गावर)

**आदरांजली**

# डॉ. गं. ना. जोगळेकर : एक संस्थासमर्पित जीवन

नीलिमा गुंडी

डॉ. गं.ना. जोगळेकर यांचे १४ ऑगस्ट २००७ला निधन झाले. एक संस्थासमर्पित जीवन काळाच्या पडद्याआड गेले. डॉ. जोगळेकर आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्यात एक अतूट नाते होते. वीस वर्षांहून अधिक काळ ते परिषदेच्या कार्यात गुंतलेले होते. कार्यवाह ते कार्याध्यक्ष (चार वेळा निवडून आलेले) अशा त्यांच्या वाढत्या जबाबदारीचा प्रवास म्हणजे त्यांच्या सेवेला मिळालेली पावतीच होती. साहित्य परिषदेशी पुण्यातील काही लहान संस्थांचे संलग्नीकरण करण्यातही त्यांनी पुढाकार घेतला होता. इतरही काही संस्थांशी ते संबंधित होते. मराठी अभ्यास परिषदेच्या स्थापनेपासून गेली पंचवीस वर्षे ते संस्थेत कार्यरत होते. अनेक वर्षे ते कार्यकारी मंडळावर होते आणि गेली तीन वर्षे ते कोशाध्यक्ष होते. 'भाषा आणि जीवन' (त्रै.)च्या संपादक-मंडळाचे आणि अलीकडे सल्लागारमंडळाचेही ते एक सदस्य होते. संस्थेची घटनादुरुस्ती तसेच निवडणूककार्यक्रम यांत त्रुटी राहू नयेत, म्हणून ते मोलाचे मार्गदर्शन करीत असत. मराठीचा विकास आणि प्रचार हा त्यांचा ध्यासच होता.

सुमारे वीस वर्षांपूर्वी पुणे विद्यापीठात वाणिज्य शाखेच्या अभ्यासक्रमात मराठीचे स्थान डळमळीत झाले होते, तेव्हा त्यांनी 'मराठी प्राध्यापक संघटना' ही चळवळ उभी करून मराठीची अभ्यासक्रमात पुन:प्रतिष्ठापना करण्यात यश मिळविले. इतकेच नव्हे, तर या संघटनेच्या माध्यमातून विविध चर्चासत्रांचे आयोजन करून नव्याने प्राध्यापक झालेल्या मंडळींची अभ्यासाची बैठक भक्कम व्हावी, यासाठी त्यांनी सातत्याने प्रयत्न केले. त्यामुळे मराठीच्या प्राध्यापकांमध्ये ते अतिशय लोकप्रिय होते.

शासनाच्या 'पहिलीपासून इंग्रजी' या धोरणाला त्यांनी विरोध केला व समाजातील एका मोठ्या वर्गाचा रोष ओढवून घेतला. ते झुंझार वृत्तीचेच होते आणि विरोधकांचा मुलाहिजा न बाळगणे, हा त्यांचा स्वभाव होता.

सरांकडे संस्थेच्या कामासाठी आवश्यक ती प्रत्युत्पन्न स्मरणशक्ती होती, चिवट कार्यशील वृत्ती होती, वक्तशीरपणा, नियोजनशीलता होती आणि मुख्य म्हणजे वाङ्मयीन परंपरेविषयीची आस्थाबुद्धी होती. म्हणूनच स्वत:तील लेखक काहीसा बाजूला








सारून त्यांनी या परंपरेचा पाईक होण्यात धन्यता मानली.

भाषा, व्याकरण आणि वाङ्मयाचा इतिहास हे त्यांचे विशेष अभ्यासाचे विषय होते. त्यांची व्यासंगी वृत्ती त्यांच्या संपादन व समीक्षापर लेखनातून दिसून येते. सुरुवातीच्या काळात त्यांनी उत्तम विडंबनकविता लिहिल्या. 'आणीबाणीतील कविता'- ''झिरपलेली किरणे'' (संपा० डॉ. अरुण लिमये, १९७७)मध्ये पहिलीच कविता जोगळेकरांची आहे. कवितेचे शीर्षक आहे - 'मला काय त्याचे !' त्यात ते उपरोधिक सुरात लिहितात :

''स्मरा मंत्र सोपा, वदा नित्य वाचे-
'मला काय त्याचे', 'मला काय त्याचे' '' (पृ. १३)

स्वत:चे जीवन सार्वजनिक कार्यात व्यतीत केलेल्या जोगळेकरांना इतरांच्या आत्मकेंद्री वृत्तीवर अशी टीका करायचा अधिकार होता !

त्यांच्या स्मृतींना मराठी अभ्यास परिषदेतर्फे नम्र अभिवादन !

■

**डॉ. गं. ना. जोगळेकर यांची ग्रंथसंपदा**

(१) 'अभिनव भाषाविज्ञान', सुविचार प्रकाशन, पुणे, १९८७

(२) 'मराठी भाषेचा इतिहास', श्रीविद्या प्रकाशन, पुणे, २००५ (महाराष्ट्र शासन पुरस्कारप्राप्त)

(३) 'साहित्य समीक्षा : स्वरूप आणि विकास', व्हीनस प्रकाशन, पुणे, १९८१

(४) सहसंपादन - 'मराठी टीकाकार', यशोदा प्रकाशन, पुणे, १९७९

(५) संपादन - 'मराठी वाङ्मयाचा अभिनव इतिहास' (खंड १ व २) स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १९९३

(६) संपादन - 'शतकस्मृती' (न्यू इंग्लिश स्कूल, पुणेविषयी), डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणे, १९८०.

**आगामी**

(१) 'महाराष्ट्र आणि मराठी', श्रीविद्या प्रकाशन, पुणे.

**आदरांजली**

# मायमराठीचा नाका : वासू देशपांडे

**न.म. जोशी**

पुण्याच्या सिंहगड रस्त्यावरील साने गुरुजी स्मारक संकुलात रावसाहेब पटवर्धन शाळा आहे. या शाळेचे मुख्याध्यापक होते कृ.गो. देशपांडे. या नावावरून असंख्य देशपांडे व खूपसे मुख्याध्यापक यांतील एक कुणी देशपांडे एवढाच बोध होईल. पण वासू देशपांडे म्हटलं की याच कृ.गो. यांचे अनेक आयाम लक्षात येतील. वासू देशपांडे हा चळवळीतला कार्यकर्ता होता आणि त्याचवेळी चळवळ्या कार्यकर्ता होता. म्हणूनच त्यांनी मुख्याध्यापक या नात्याने पटवर्धन विद्यालय जसे चालविले तशीच महाराष्ट्रभर मराठी शिक्षणाची अनौपचारिक शाळा चालविली. महाराष्ट्रात अनेक ठिकाणी त्या त्या विषयांचे अध्यापक संघ आहेत. वासू देशपांडे यांनी मराठी अध्यापक संघ वाढविला आणि त्याचा महाराष्ट्र मराठी माध्यमिक शिक्षक संघ म्हणून विस्तार केला. या संघाचे ते शेवटपर्यंत मानद अध्यक्ष होते. संस्थापक तर होतेच. बॅ. नाथ पै यांचा त्यांना सहवास लाभला होता. राष्ट्रसेवादलाच्या संस्कारात वाढलेल्या वासू देशपांडे यांनी हैदराबाद मुक्तिसंग्राम, गोवा मुक्ती आंदोलन यामधेही भाग घेतला होता. त्याबद्दल ते तुरुंगाची हवा खाऊन आले. कोकणात, सिंधुदुर्ग जिल्ह्यात काही काळ शिक्षकी पेशा पत्करून मग ते पुण्यात आले. त्यांच्या सहकाऱ्यांनी तळागाळातील मुलांसाठी शाळा काढायचं ठरवलं. तिचं नेतृत्व वासू देशपांडे यांच्याकडे दिलं. शाळा हा त्यांचा ध्यास होताच. पण शिक्षणक्षेत्रातील स्काऊट चळवळीसारख्या चळवळीतही त्यांनी खूप काम केले.

या सर्व कामांमध्ये त्यांच्या मनातला मराठी भाषाप्रेमी सदैव आघाडीवर होता. वासू देशपांडे काही काळ महाराष्ट्र साहित्य परिषदेचे चिटणीस होते. तिथंही आपल्या कालखंडात त्यांनी मराठी भाषा विकासाच्या चळवळीचे कार्यक्रम अंमलात आणले. त्यांच्या पुस्तकांना राज्यपुरस्कार लाभले. पण केवळ लेखनात रमण्यापेक्षा इतरांना लेखनप्रवृत्त करण्याकडे वासू देशपांडे यांचा कल अधिक होता. आदर्श मुख्याध्यापक म्हणून त्यांना पुरस्कार मिळाला. महाराष्ट्र मुख्याध्यापक संघाचे ते अध्यक्ष झाले. त्या व्यासपीठावरूनही त्यांनी मराठीचा वापर, मराठीचे अध्ययन-अध्यापन यांबाबत आपले विचार अत्यंत तळमळीने मांडले होते. महाराष्ट्र मराठी अध्यापक संघटनेच्या वतीने

त्याच नावाचे एक त्रैमासिक चालवले जाते. या त्रैमासिकाच्या संपादकपदाची जबाबदारी त्यांनी सतरा वर्षे सांभाळली. अनेक शिक्षकांना लिहिते केले. अनेक शिक्षकांच्या मराठीविषयक उपक्रमांना या त्रैमासिकाच्या पानांवर मानाचे स्थान मिळाले.

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षक परिषदेच्या वतीने शिक्षकांसाठी जे सेवांतर्गत प्रशिक्षणवर्ग घेण्यात येतात त्यांमध्ये मराठी अध्यापनाचे तज्ज्ञ म्हणून त्यांनी निरलसपणे काम केले. टिळक शिक्षण महाविद्यालयाच्या विस्तारविभागाच्या वतीने ज्या मराठी-कार्यशाळा घेण्यात आल्या त्यामध्ये त्यांचे मार्गदर्शन लाभले. वासू देशपांडे हे समाजमनस्क कार्यकर्ते असल्यामुळे प्रमाणभाषा व बोलीभाषा यांबाबत जेव्हा जेव्हा काही वादाचे मुद्दे उपस्थित होत, तेव्हा त्यांचा कल बोली भाषेकडे अधिक असे. मात्र प्रमाणभाषेला त्यांचा विरोध नव्हता. प्रमाणभाषेची स्थापना जनसामान्यांच्या मनात करणे हेच तर आपले काम आहे, असे ते समजत. 'महाराष्ट्र मराठी अध्यापक' या त्रैमासिकात 'माझे पान' आणि 'मी वाचलेले पुस्तक' ही त्यांची स्फुटे अत्यंत वाचनीय व मार्गदर्शक असत. व्याकरणाचा बाऊ न करता आत्माविष्काराचे व संवादाचे प्रभावी माध्यम म्हणून मातृभाषेचा वापर केला पाहिजे, असे त्यांचे आग्रही मत होते. निवृत्तीनंतरही मराठीच्या प्रेमामुळे महाराष्ट्रभर सदैव भ्रमंती करणाऱ्या वासू देशपांडे यांनी आपल्या 'वासूनाक्यावर' मराठीप्रेमी शिक्षकांचे एक मोहोळ जमवले होते. या नाक्यावर जतचे डॉ. श्रीपाद जोशी, कोल्हापूरचे बा.ग. यादव, श्रीकांत नाईक, मुंबईचे श्रीपाद भागवत, जळगावचे सुभाष कवडे, साताऱ्याचे वि.ना. लांडगे अशा असंख्य मराठी शिक्षकांची ये-जा असे. आता मात्र हा वासूनाका शांत आहे. ■

१०१३, सदाशिव, गंधाली, पुणे 411 007. / (020)24476868/9226575290

## लेखकांसाठी सूचना : १

पुढील विषयासंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे :
मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ०) भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे.

आदरांजली

# डॉ. माधवी आपटे

**प्र.ना. परांजपे**

'भाषा आणि जीवन'च्या लेखिका, मराठी अभ्यास परिषदेच्या आजीव सदस्य आणि इंग्लिश भाषा, वाङ्मय व भाषाविज्ञान या विषयांच्या प्राध्यापक डॉ. माधवी आपटे यांचे ३ सप्टेंबर रोजी औरंगाबाद येथे आकस्मिक निधन झाले. औरंगाबाद येथे एम्.ए.पर्यंत शिक्षण घेतल्यानंतर हैदराबाद येथील सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंग्लिश अँड फॉरिन लँग्वेजिझमधून त्यांनी एम्.लिट.पदवी आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातून पीएच.डी. पदवी मिळवली. त्यांनी प्रारंभी औरंगाबादच्या सरस्वती भुवन महाविद्यालयात अध्यापन केले. त्यानंतर डॉ. आंबेडकर-मराठवाडा विद्यापीठ आणि थायलंड व मेक्सिको येथे त्यांनी इंग्रजी भाषा, भाषाविज्ञान इत्यादीचे अध्यापन केले. १९९५पासून आठ वर्षे औद्योगिक क्षेत्रातील विविध कंपन्यांमध्ये व व्यवस्थापन शिक्षण संस्थांमध्ये 'व्यवस्थापकीय व्यावसायिक संदेशन' या विषयाचे त्यांनी अध्यापन केले. २००५पासून महात्मा गांधी मिशन, औरंगाबाद या संस्थेच्या 'इंडियन अँड फॉरीन लँग्वेजिझ रिसर्च सेंटर'च्या संचालक म्हणून त्या काम करीत होत्या. एमिली डिकिन्सनच्या ११४ कवितांच्या अनुवादाचे 'गूढरम्या एमिली' (१९९३) व नोबेल पारितोषिक विजेत्या लेखकांच्या चौदा कथांचे अनुवाद समाविष्ट असलेले 'नोबेल चतुर्दशी' (२००४) अशी त्यांची दोन पुस्तके प्रकाशित झाली आहेत. या शिवाय कथा व कवितांचे अनुवाद (उदा० कुसुमाग्रजांच्या 'पृथ्वीचे प्रेमगीत'चा इंग्रजी अनुवाद, अमृता प्रीतम यांच्या कवितांचा मराठी अनुवाद) अनेक लेख, पुस्तक-परीक्षणे असेही त्यांचे लेखन प्रसिद्ध झाले आहे. 'एक्स्प्लोरेशन्झ इन अप्लाइड लिंग्विस्टिक्स' या ग्रंथाच्या त्या सहसंपादक होत्या. 'सामाजिक भाषा-विज्ञान : कक्षा आणि अभ्यास' (संपादक : डॉ. जयश्री पाटणकर) या ग्रंथात त्यांचे तीन लेख समाविष्ट आहेत.

अत्यंत मेहनती, सातत्याने उत्साही, मित्र-मैत्रिणी, सहकारी व विद्यार्थी यांच्याशी विविध विषयांवर बोलण्याची विशेष आवड असणाऱ्या डॉ. आपटे यांना योगी अरविंदांचे तत्त्वज्ञान व वाङ्मय आणि पाँडिचेरी येथील आश्रम यांमध्ये विशेष रस होता. मेंदूतील रक्तस्रावामुळे त्यांना मृत्यू आला, तेव्हा त्यांचे वय अठ्ठावन्न होते. ■

# संस्कृत आणि प्राकृत

विश्वनाथ खैरे

हिमालय पर्वताची कन्या पार्वती. तिने शंकर हा आपला पती व्हावा म्हणून तप केले. यथावकाश तप फळाला आले आणि लग्न झाले. त्यांना पुत्रप्राप्ती झाली. त्या पुत्राने तारकासुर नावाच्या राक्षसाला मारले. या सगळ्या कथेचे 'कुमारसंभवम्' हे संस्कृत महाकाव्य कालिदासाने लिहिले.

**दैवी विवाहाचे वर्णन**

त्या काव्याच्या सहाव्या सर्गात पार्वतीला मागणी घालायला सप्तर्षी आकाशमार्गाने हिमालयाकडे आल्याचे वर्णन आहे. वेताच्या आसनावर त्यांना बसवून हिमालयाने त्यांची स्तुती केली. आंगिरस ऋषींनी हिमालयाला सांगितले की, 'आमच्या मुखाने शिवच तुमच्या कन्येला मागणी घालतो आहे.' त्या वेळी पार्वती पित्याच्या पाठीशी कमळाच्या पाकळ्या मोजीत होती. तिच्या आईकडे पाहून तिची संमती मिळाल्यावर हिमालयाने पार्वतीला पुढे घेऊन ऋषींना म्हटले, ''ही शिववधू आपणांला नमस्कार करतेय.'' तिला अरुंधतीने मांडीवर बसवून घेतले. हिमालयाने विचारल्यावरून ऋषींनी चार दिवसांनंतरची तिथी पक्की केली.

सातव्या सर्गात लग्नघरातले आणि विवाहसोहळ्याचे वर्णन आहे. शुक्लपक्षातल्या शुभतिथीला वधूला विवाहदीक्षा दिली. परिवारातल्या आणि बाहेरच्याही कितीकांनी मांडीवर घेऊन तिला आशीर्वाद दिले. चंद्र फाल्गुनी नक्षत्रात असताना लेकुरवाळ्या सुवासिनींनी तिचा शिणगार केला. तिला चौकात नेऊन सुवर्णकुंभांनी न्हाऊ घातले. धूपाने केस सुकवून दुर्वा, गोपीचंदन, मोहफुलांच्या माला यांनी तिला सजवले. तिची पावलं रंगवल्यावर सख्या म्हणाल्या, ''पतीच्या माथ्यावरच्या चंद्रकलेला हे लाव बरं का.'' मग तिची आई मेना हिने तिला विवाहतिलक लावला, कुलदेवतांना आणि सुवासिनींना नमस्कार करायला लावले. तिकडे कैलासावर सप्त मातृकांनी शिवालाही अलंकारिले. नंदीवर बसून शंकर निघाले, त्यांच्या मागे मातृका आणि महाकाली होत्या. गंगायमुना मूर्तरूपाने चवऱ्या ढाळीत होत्या. सप्तर्षींना 'तुम्ही माझे पुरोहित' असे शिवाने सांगितले. हिमालयाच्या औषधिप्रस्थ नगरापाशी पोचल्यावर भूमीवर उतरून शिवाने







वंदन केले तेव्हा हिमालयच लाजल्यासारखा झाला. शिवाला पाहण्यासाठी स्त्रियांची एकच गडबड उडाली.

लग्नघरात, रत्ने टाकलेले पाणी शिवाच्या पायांवर घातले आणि हिमालयाने रेशमी वस्त्रे दिली ती शिवाच्या अंगात घालून त्याला वधूकडे नेले. वधूवरांनी हातात हात घेऊन अग्नीला प्रदक्षिणा घातल्या. पुरोहिताने वधूच्या हाताने लाजाहोम करविला आणि तिला म्हटले, ''तुझ्या विवाहाला अग्नी साक्ष आहे. पती शिवासह धर्माने वाग.'' शिवाने तिला ध्रुवतारा दाखवला. मग त्यांनी ब्रह्मदेवाला जोडीने नमस्कार केला. त्याने 'वीरप्रसू हो' असा तिला आशीर्वाद दिला. नंतर ती दोघे सोन्याच्या आसनावर बसली तेव्हा लोकरीतीप्रमाणे भाताची कोवळी रोपे त्यांच्यावर टाकली. नंतर त्या दोघांवर स्वतः लक्ष्मीने लांब दांड्याच्या कमळाचे छत्र धरले.

**कविकालीन वास्तव**

कालिदासाने देवदेवतांच्या विवाहाचे वर्णन केले असले तरी विधींचे वगैरे तपशील मात्र त्याच्या समकालीन समाजातल्या चालीरीतींचेच आहेत. भारतात सामाजिक विधी-उत्सव शेकडो वर्षे तसेच साजरे होत आले आहेत. त्यामुळे भाताची कोवळी रोपे अंगावर टाकण्याच्या विधीला चौथ्यापाचव्या शतकातला कालिदास 'लौकिक' म्हणतो आणि चौदा-पंधराव्या शतकातला टीकाकार मल्लिनाथ ''लौकिक आचार मनानेही डावलू नये'' असा त्याला शास्त्राधार देतो. थोड्याफार फरकाने आजचेही विवाह असेच होतात. त्यामुळे शिवपार्वतीच्या विवाहाचे हे वर्णन आपल्याला फार ओळखीचे वाटण्यासारखे आहे. वधूवर, आप्तगोत आणि वऱ्हाडी भले दैवी अतिमानवी (पर्वत, नद्यासुद्धा) असोत, त्यांची चालचलणूक कवीच्या परिसरातल्या माणसांसारखीच वर्णिलेली असते. त्याचमुळे कथेतल्या पात्रांचे चरित्र जरी अद्‌भुतांनी भरलेले असले तरी ते (आजच्या अर्थाने) ऐतिहासिक नसते.

पुराणकथेचा हा विशेष समजून घेतला तर तिच्या शब्दवर्णनांना आपण प्रमाण मानणार नाही किंवा पुराणकथांवरून इतिहास काढणार नाही. तरीसुद्धा त्या शब्दवर्णनांच्या मागे कविकालीन वास्तव दडलेले असते ते चिकित्सकपणे पाहिले तर सामाजिक-सांस्कृतिक इतिहासाची एखादी झलक आपल्याला मिळते.

**संस्कृत-प्राकृतांचा उपयोग**

शिवपार्वतींच्या या विवाहात लक्ष्मी छत्र धरायला आली; पाठोपाठ सरस्वतीही स्तवन करायला आली. ''सरस्वतीने *दोन प्रकारच्या भाषेने* त्या दोघांच्या जोडप्याची स्तुती केली. त्या सुयोग्य वराची *संस्कारपूत* भाषेत, तर वधूची *समजायला सोप्या भाषेत!''* (द्विधाप्रयुक्तेन च वाङ्मयेन सरस्वती तन्मिथुनं नुनाव । संस्कारपूतेन वरं

वरेण्यं वधूं सुखग्राह्यनिबन्धनेन ।।७.९०।।) या श्लोकातल्या पदांचा अर्थ टीकाकार मल्लिनाथाने स्पष्ट केला आहे. '' 'द्विधाप्रयुक्तेन' म्हणजे संस्कृत-प्राकृत या दोन रूपांत म्हटलेल्या. 'संस्कारपूतेन' म्हणजे प्रकृतिप्रत्ययविभागशुद्ध संस्कृतात, वराची स्तुती. 'सुखग्राह्यनिबन्धनेन' म्हणजे सुबोध रचनेन अर्थात प्राकृतात, वधूची स्तुती. शिव हा पुरुष म्हणून त्याच्यासाठी संस्कृत, पार्वती स्त्री म्हणून तिच्यासाठी प्राकृत !''

देवता असली, जगन्माता असली, तरी पार्वती स्त्री असल्यामुळे तिला संस्कृत समजणार नव्हते, तिला सरस्वतीनेसुद्धा प्राकृतच ऐकवणे लोकरीतीला धरून होते. हा सामाजिक नियम होता. स्त्रियांना संस्कृत समजत नव्हते, त्यांचा व्यवहार प्राकृतातच होत होता. प्राचीन काळापासून चालत आलेली ही स्थिती पाचव्या ते पंधराव्या शतकात तशीच होती. प्राचीन काळापासून नाटकांमधल्या स्त्रीपात्रांचे बोलणे प्राकृतात असावे असा दंडकच होता. कालिदासाच्याच 'शाकुंतल' नाटकाच्या सातव्या अंकात मारीच ऋषी आणि त्यांची पत्नी अदिति (दाक्षायणी) यांचा संवाद आहे. ऋषी संस्कृतात सांगतात, ''तुझ्या पुत्राच्या (इंद्राच्या) बाजूने आघाडीवर लढणारा हा बघ दुष्यन्त नावाचा जगाचा राजा.'' त्यावर पत्नी आदिति प्राकृतात म्हणते, ''त्याच्या आकृतीवरूनच तसं वाटतं'' (संभावणीआणुभावा से आकिदी !- 'संभावनीयानुभावा अस्य आकृतिः ।') प्रत्यक्ष देवांचा राजा इंद्र याची आई संस्कृतात बोलत नाही. (नवऱ्याचे संस्कृत संदर्भाने तिला समजते असे मानले पाहिजे !)

भारतीय संस्कृतीने स्त्रियांना नेहमीच पुरुषांच्या खालचे स्थान दिले. भारतात स्त्री-शूद्रांना संस्कृत ऐकण्याची मुभा नव्हती. काव्य-कथांमध्ये या स्थितीचे प्रतिबिंब साहजिकच पडले आहे. खुद्द संस्कृतचे रूप आणि स्थिती काय होती ? ''..स्थल-काल-लोक या बंधनांना बाजूस ठेवून आपल्या ज्ञानव्यवहारासाठी विद्वान एखादी प्रशिष्ट संभाषण कृती घडवीत राहतात. संस्कृत ही एक अशी प्रशिष्ट कृती (अॅ-कल्चरेटेड आर्टिफॅक्ट) होती; ती प्रत्यक्ष बोली नव्हती'' (माहुलकर २००२, पृ. ४६) व्यवहारातली बोली नसलेल्या अशा प्रशिष्ट कृतीतून प्राकृतांसारख्या भाषा निघाल्या किंवा भारतार्य म्हटलेल्या भाषांचे मूळ तिच्यात आहे, अशा प्रणाली वास्तवाला किंवा इतिहासाला धरून नाहीत. विद्यापीठांमधले भाषाविज्ञानाचे अभ्यासक्रम मात्र याच गृहीतांवर ठाम आहेत. भाषा-कथा-संस्कृतींचा समवायाने विचार करून भारतीय भाषाविज्ञानात जरूर ते फेरबदल केले पाहिजेत. ■

(संदर्भ : माहुलकर, दिनेश द. २००२. 'वृद्धिः' राज्य मराठी विकास संस्था, मुंबई)

३७४, सिंध सोसायटी, औंध, पुणे 411 007. दूरध्वनी (020) 25883187

# भाषिक प्रतिभा

द.भि. कुलकर्णी

दैनंदिन कामे करताना आपण आपल्या तनामनाची एक विशिष्टच शक्ती वापरीत असतो; जसे, केर काढायचा म्हटले की, केरसुणी घेतली, पुंजा कोपऱ्यात जमा केला; गाडी चालवायची म्हटले की, स्वीच ऑन केला, एंजिन सुरू केले, वगैरे.

तिथेही मनाच्या, शरीराच्या इतर शक्ती काम करीतच असतात; पण किमान स्तरावर; मात्र साहित्यनिर्मितीच्या समयी आपण भाषा वापरतो तेव्हा यापेक्षा वेगळीच प्रक्रिया घडत असते.

तेव्हा आपली अनुभूतीच भाषांकित असते; तेव्हा आपण भाषेतूनच अनुभव ग्रहण करीत असतो, हे तर झालेच; तेव्हा भाषा आणि अनुभव यांचे अविभागीकरणच नव्हे तर त्यांचे एकरूपीकरणच झालेले असते; तरी - तरी तेव्हा नेमके घडत काय असते? तेव्हाच्या भाषिक प्रक्रियेचे स्वरूप काय असते ?

तेव्हा श्रुती-स्मृती, तर्क-मती, प्रत्यक्षाभास-साहचर्य, अबोध-अर्धबोध आणि सौंदर्यवृत्ती अशा मनाच्या विविध शक्तींचा एकमेळ होत असतो; त्यांचा एकात्मपणे आपण वापर करीत असतो; चपळपणे आलटून पालटूनही वापर करीत असतो. एकाग्रता आणि अष्टावधान यांचा असा सुमेळ आपण एरव्ही कधीच अनुभवलेला नसतो. मनाचा चंचलपणा हा अध्यात्ममार्गात प्रमाद असेल; लौकिक मार्गात तो गुणच असतो - त्यामुळेच तर आपण व्यवहारात सावध राहू शकतो. भाषिक निर्मितिसमयी मात्र मनाचे चांचल्य आणि मनाचे तादात्म्य या दोन विशेषांचे संपूर्ण एकत्रीकरण झालेले असते.

ही भाषिक शक्ती काहींमध्ये जन्मप्राप्त असते प्रचुर प्रमाणात; ही भाषिक शक्ती काहींमध्ये अल्प प्रमाणातच असते मुळातच. संस्कार, शिक्षण, निरीक्षण, वाचन, चिंतन, सराव इत्यादी मार्गांनी ती विदग्ध करता येते; पण तिच्यात आमूलाग्र बदल नाही करता येत. हे डावे-उजवेपण कोणीच नाही बदलू शकत आपले-मज्ञातज्ज्ञदेखील.

तुडुंब भाषिक प्रतिभा असलेल्याचे भाषण वा लेखन अनुभवले की ही भाषाप्रक्रिया किती गुंतागुंतीची आणि गूढ आहे याची जाणीव होते; आपण एरव्ही भाषाप्रक्रिया

किती अनघडपणे हाताळतो हे जाणून मन खंतावतेही.

प्रासप्रधान श्रुतिमधुर भाषा, अर्थालंकारप्रधान अर्थातिरेकी भाषा, सूचकताप्रधान प्रतिमामय भाषा, तर्कप्रधान प्रतीकनिष्ठ भाषा, वक्तृत्वनिष्ठ संबोधनप्रधान भाषा, नाट्यनिष्ठ संवादबहुल भाषा, अपरिचित शब्दांनी चित्त वेधून घेणारी परधार्जिणी भाषा, बोलीतील लकबींनी हेलावलेली भाषा... अशी भाषारूपे योजायला भाषिक प्रतिभेची फारशी गरज नसते; थोडीशी असते-ती अनुकरणाने आत्मसात करता येते. पुढे पुढे तर ती मनाची सवयच होऊन जाते; काहींचे ते व्यसन असते, काहींची ती मनोव्याधी असते. वेडसर माणसाचे बरळणे ऐकले म्हणजे या विविध भाषिक शक्ती एकप्रयत्नोत्पाद्य नसल्या, एकार्थक नसल्या म्हणजे भाषेचा कसा गोमकाला होतो ते कळते. चला, भाषेत अशा विविध शक्ती असतात, हे तर त्यामुळे आपल्याला कळते !

असे मनोविकृत, व्यसनी, सवयीचे गुलाम साहित्यिक सहज ओळखू येतात : ते ठरावीक भाषा-विशेषांचा वारेमाप आणि पुनरावृत्त आणि प्रयोजनरहित वापर करीत असतात. ते सहज ओळखू येतात.

- मनोगत अन्यूनअनतिरिक्त अभिव्यक्त करणे;
- ती वाचकाच्या जाणिवेत लीलया संक्रमित करणे;
- वाचकाला त्यात भर घालता येईल अशी बीजस्थळे त्यात पेरणे;
- तो आशय त्याला जाणिवेत घोळवावासा वाटेल असे धर्म त्याला देणे;
- त्या आशयाला केंद्र असणे आणि केंद्राची प्रभाच असा परीघ असणे;
- केंद्रातून आशय उचंबळतोय की केंद्रात तो विसर्जित होतोय याचा निर्णय वाचकास न घेता येणे इतका तो आशय गतिमान असणे;
- त्या आशयातील घटकांनाही गती असणे;
- अशा गतीमुळे त्या घटकांचे रूप, प्रयोजन आणि अर्थ बदलत जाणे;
- त्यांचे एकमेकांशी नाते बदलत जाणे व त्यामुळे त्यांचे नवनवे व्यूह तयार होणे; तोबा, तोबा !

हे सारे साधण्यासाठीच तर साहित्यिकाला नाद, स्मरण, अनुमान, ज्ञान, मूल्य, साहचर्य, सौंदर्यभावना, जैविक भावना इत्यादी सारे पणाला लावून भाषा वापरावी लागते.

एवढ्याने काय झाले ! हे सगळे गुण वाचकातही असावे लागतात.

व्यवहारात एखादी परभाषा आपल्याला वाचता येते, समजते, पण बोलता येत नाही. वाचकाची स्थिती अशीच असते. त्याला साहित्याची भाषा वाचता येते, समजते; पण बोलता येत नाही - या अर्थानेही साहित्याची भाषा परभाषा आणि पराभाषा

असते. ही साहित्याची पराभाषा वाचकाला बोलता आली असती तर तो स्वत:च साहित्यिक नसता झाला? सरितेला हे भाग्य कुठले की ती उगमापाशीच स्थिर राहील आणि तिथेच तिचा सागर होईल; तिला तर कडेकपारीतून, रानावनातून वळणावाकणाने पळावे लागते, कोसळावे आणि सरपटावे लागते तेव्हा कुठे तिचे आणि समुद्राचे मिलन होते; नाही ? वाचकासही स्वस्थानाचे सुख सोडून सुदूरच्या साहित्यकृतींपर्यंत पोचायचे असते; सहस्त्रधारांनी त्यास मिळायचे असते; आपले नामरूप जलधिमय करून टाकायचे असते; काय ?

साहित्य आणि साहित्यिक यांची ही थोरवी मंजूर करणे जिवावर येतेय काय ? थांबा. इतके हिरमुसू नका.

अहो, साहित्यिकाजवळ भाषिक निर्मितिशक्ती असते; पण भाषिक आस्वादशक्ती नसते. नवल वाटते नं ? पण ही वस्तुस्थिती आहे. काहो, नट नाटकाचा आस्वाद घेत असतो का ? छट्. नाटकाचा आस्वाद प्रेक्षकच घेत असतो. नाट्यगृहातील खांब-खुर्च्या, तिकीटवाला-बत्तीवाला हे जसे नाटकाचा आस्वाद घेत नसतात तसा नटही नाटकाचा आस्वाद घेत नसतो. पटत नाही नं, पण हे खरं आहे. भलेही त्याची भूमिका आणि त्याचे कार्य पडदेवाल्यापेक्षाच नव्हे प्रेक्षकांपेक्षा, लेखकांपेक्षाही महत्त्वाचे आणि जोखमीचे असेल - असतेच. प्रश्न तो नाही राव; प्रश्न तो नाट्यकृतीचा आस्वाद घेतो का हा आहे. बोला. सोडा.

अहो, साहित्यिकाजवळ भाषिक निर्मितिशक्ती असते; पण भाषिक आस्वादशक्ती असतेच असे नाही; नसतेच. तो रसिक असतोच असे नाही; नसतोच. भाषेतून तो विभिन्न अर्थविभ्रम आविष्कृत करू शकतो; पण अशा अर्थविभ्रमाचा आस्वाद घेण्याची शक्ती त्याजपाशी असतेच असे नाही; नसतेच. झाला नं हिरमोड दूर ? की नवाच हिरमोड उस्नावला ?

अहो, अनेक अस्सल प्रतिभावंत साहित्यिक अरसिक, रुक्ष, व्यवहारी, मनोविकृत असल्याचे तुम्हांस माहीत नाही ? ते सतत स्वत:बद्दल आणि स्वत:च्या साहित्याबद्दलच बोलत असतात : दुसऱ्याची कविता वाचली की 'माझी कविता कशी यापेक्षा वेगळी आणि वरचढ आहे' असे ग्रहणविघ्नच त्यांच्या ग्रहणाला लागते; दुसऱ्याची कथा वाचली की 'ही कथा मी लिहिली असती तर कशी लिहिली असती' या आस्वादविघ्नाने त्याचा आस्वाद मलिन होऊन जातो; आस्वादकाच्या विमलभावाने त्याला दुसऱ्याच्या साहित्यकृतीचा आस्वाद घेताच येत नाही; तो वाचकाच्या भूमिकेतून नव्हे; तर लेखकाच्या भूमिकेतून इतरांच्या साहित्यकृतींचा 'आस्वाद' घेत असो - भलेही मग त्याच्या लांबच लांब आणि खोलच खोल पत्रांमध्ये ग्रंथवाचनाचे कितीही संदर्भ असोत;

तो आस्वाद शेंड्यापुरताच आणि खारट-तुरटच असतो; इतरांच्या साहित्यकृतींच्या मुळापर्यंत तर सोडाच मधल्या पेरकांडांपर्यंतही तो जाऊ शकत नाही. असे नसते तर अमुक साहित्यकृती आपणास का आवडली- का आवडली नाही, ती कशी सामान्य किंवा असामान्य आहे हे त्याने आपल्या प्रपत्रांत सांगितले नसते ?

अहो, असेही जेव्हा जो कोणी करतो तो आपल्या वाङ्मयीन भूमिकेचे - निर्माता म्हणून असलेल्या भूमिकेचे-, अभिरुचीचे, निर्मितीचे समर्थन, उद्घाटन आणि विवरणच करीत असतो. आस्वादशक्ती नसल्यामुळे स्वत:च्या साहित्यकृतीसंबंधीचे त्याचे बोलणेही भुंडे आणि दूषित असते. म्हणून तर साहित्यिकाच्या समीक्षेला एका थोर कवीनेच 'वर्क-शॉप समीक्षा' म्हटले आहे. साहित्यिक हा लिहितानाच नाही नेहमीच साहित्यिक असतो. झाले समाधान ? नाही ?

सांगतो. रसिक हा आस्वादकही असतो आणि निर्माताही असतो; निर्माता हा फक्त निर्माताच असतो.

ही वस्तुस्थिती किती दिलासा देणारी आहे रसिकासाठी; आणि किती चीड आणणारी आहे साहित्यिकासाठी; पण अर्थात हे सारे अस्सल रसिक आणि अस्सल साहित्यिक यांनाच लागू पडते; तुम्हा-आम्हाला नाही ! काय ?

पटले आता ? ■

'वसुधा', ई-004 डीएसके विश्व, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे 411 041
दूरध्वनी (020) 24380894

---

**परीक्षणासाठी आलेली पुस्तके**

- 'कहाणी एका लोकविलक्षणाची' मूळ लेखक : येवगेनी येवतुशेन्को, अनुवादक - भगवंत क्षीरसागर, संगत प्रकाशन, नांदेड. २००६, पृ. १३५, किंमत रु.१२५/-
- 'समर्थ वाङ्मय : मनोवेधक आस्वाद', लेखक व प्रकाशक : ह.श्री. परांजपे, ठाणे. पृ. ७२, किंमत रु. १००/-
- 'श्री मनाचे श्लोक : मनोवेधक मनन-चिंतन', लेखक व प्रकाशक: ह.श्री. परांजपे, ठाणे. पृ. २२८, किंमत रु. १५०/-
- 'चिगूरनंतरच्या कविता' : चिगूर प्रकाशन, मनमाड. पृ. ११८, किंमत रु.१००/-
- 'आधुनिक समीक्षा-सिद्धान्त' : मिलिंद मालशे, अशोक जोशी, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ व मौज प्रकाशन गृह, मुंबई. पृ. ३५२+१५, किंमत रु. २७५/-
- 'अरेबा परेबा आणि इतर कथा' : उदय प्रकाश. अनुवाद - जयप्रकाश सावंत पेंग्विन बुक्स, नवी दिल्ली. पृ. १४९+१४, किंमत रु. १२६०/-

---

# गुजरातीमधील भाषाविज्ञानाची सद्यस्थिती

अरविंद भांडारी

भारतातील भाषिक अभ्यासाची परंपरा संस्कृत व्याकरणकालापासून चालत आलेली आहे. शेवटच्या दोन शतकांत आधुनिक भाषाविज्ञानाची प्रगती सविशेष व अनेकविध झाली असली तरी संस्कृत व्याकरणपरंपरा संपूर्ण सोडण्यात आली नाही. आधुनिक भाषाविज्ञान खऱ्या अर्थाने भारतीय भाषांत विसाव्या शतकात आणि विशेषतः उत्तरार्धात आले. भारतीय भाषांच्या भाषावैज्ञानिक अभ्यासाचे आधार पाश्चिमात्य सिद्धान्त राहिले आहेत. सिद्धांतांचा उद्‌गम आणि प्रतिष्ठापना पश्चिमेत झाल्यानंतर त्यांवर आधारित वर्णने आणि सिद्धांतांचे निरूपण भारतीय भाषांतून होत गेले. अभ्यासाची दिशा आणि विषय पण पश्चिमेत स्थिरावल्यानंतर रूपांतरित होऊन भारतीय भाषांत उतरले. सैद्धान्तिक व उपयोजित अभ्यासाची गती पश्चिमेत इतकी जलद होती की भारतीय भाषांतील अभ्यास चार पावलं मागेच राहिला.

भाषाविज्ञानाच्या अभ्यासाची दिशा ध्वनिव्यवस्थेकडून क्रमाने पदव्यवस्था, वाक्यविन्यास व अर्थव्यवस्थांकडे वळली. बोलीविज्ञानाचा अभ्यास समांतर होत राहिला. त्याचप्रमाणे भाषांचा ऐतिहासिक अभ्यास होत राहिला. विसाव्या शतकाच्या शेवटी मनोभाषाविज्ञान, सामाजिक-भाषाविज्ञान, नवीन सैद्धान्तिक वाटा, शैलीविज्ञान, शब्दकोशविज्ञान, उपयोजित भाषाविज्ञान आणि संगणकीय भाषाविज्ञान ह्या विषयांकडे प्रयाण झाले. परंतु राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय देवाणघेवाण आणि प्रतिष्ठा यांसाठी भारतीय विद्वानांनी भाषावैज्ञानिक लेखन इंग्रजीतच केले. त्यामुळे भारतीय भाषांतून भाषावैज्ञानिक संशोधनपर लेखन व ग्रंथप्रकाशन तुटपुंजेच राहिले. दुसरी अडचण परिभाषेची. इंग्रजी भाषेत नवीन सिद्धांतांबरोबर नवीन संज्ञांचा भडिमार होतो. त्यांच्यासाठी भारतीय भाषांतील प्रतिशब्द निवडणे किंवा नव्याने तयार करणे हे अवघड. भारतीय भाषांतील परिभाषेचा स्रोत संस्कृत हाच होता व आजही आहे. त्यातून निर्माण होणारी संदिग्धता हीही एक अडचण ठरते. नवे सिद्धान्त, जुनी परिभाषा, किंवा नवे सिद्धान्त व जुन्या शब्दांच्या नवीन व्याख्या ह्यातून भाषाविज्ञान या विषयाची वाटचाल होत राहिली.

गुजराती भाषेतील आधुनिक भाषावैज्ञानिक अभ्यासाची सुरवात डॉ. टी. एन. दवे ह्यांच्या पुस्तकाने झाली असे म्हणता येईल. ('गुजराती भाषामां वर्णव्यवस्था', १९३३). ह्या पुस्तकातून 'स्वनिम' (फोनीम) ह्या संकल्पनेचा उपयोग केला गेला आहे. गुजराती भाषेत 'ध्वनिघटक' व 'रूपघटक' (मॉर्फीम) या संज्ञा प्रचलित आहेत. आधुनिक संरचनावादी वर्णन ह्या पुस्तकात उपलब्ध आहे. [श्री. दवेंचे अन्य पुस्तक इंग्रजी भाषेतून आहे - 'दि लँग्विज ऑफ गुजरात' (१९६४) याचे गुजराती भाषांतर १९७१मध्ये श्रीमती मीनाक्षी पटेल ह्यांनी केले.] श्री. दवेंचा 'बुद्धिप्रकाश' मासिकातून प्रकाशित झालेला 'गुजराती व्याकरणनी रचना' हा लेख आधुनिक दिशेचा होता.

त्यानंतरच्या काळात गुजराती भाषाविज्ञानाच्या क्षितिजावर डॉ. प्रबोध पंडित ह्या तेजस्वी ताऱ्याचा उदय झाला. डॉ. दवे व डॉ. पंडित ह्या दोघांनी पाश्चात्य विद्यापीठांत अभ्यास व संशोधन केले. आणि त्या जोरावर गुजराती भाषेचे वर्णन दिले. डॉ. पंडितांनी त्यांच्या छोट्या कारकिर्दीत अनेक विषय हाताळले. आंतरराष्ट्रीय स्तरावर इंग्रजीतून लेखन व स्थानिक स्तरावर गुजरातीतून लेखन केले. गुजराती भाषेचे ध्वनितंत्र, रूपतंत्र, वाक्यरचना ह्यांची अत्याधुनिक वर्णने दिलीच व त्याव्यतिरिक्त सामाजिक भाषाविज्ञान, बोलीविज्ञान, उपयोजित भाषाविज्ञान ह्या विषयांवरील स्वत:चे विचारही मांडले. गुजराती भाषेचा ऐतिहासिक पैलू पडताळून पाहिला.

'गुजराती भाषेतील मर्मर स्वरां'चे प्रतिपादन त्यांनी केले. त्यांची तीन प्रमुख पुस्तके पुढीलप्रमाणे :

(१) 'गुजराती भाषानुं ध्वनिस्वरूप अने ध्वनिपरिवर्तन'

(२) 'भाषाविज्ञानना अर्वाचीन अभिगमो'

(३) 'व्याकरण-अर्थ अने आकार'

डॉ. प्रबोध पंडित ह्यांनी गुजरात युनिवर्सिटीत भाषाविज्ञान विभागाची स्थापना केली व गुजराती भाषेत ह्या विषयाचे शिक्षण उपलब्ध झाले. ह्या विभागात त्यांच्या शिष्यांनी ती परंपरा टिकवली. डॉ. पंडितानंतर ह्या विभागात डॉ. हरिवल्लभ भायाणी आले. डॉ. भायाणी मूळ संस्कृत, पाली, प्राकृत भाषांचे संशोधक. भाषाविज्ञानाचे औपचारिक शिक्षण नाही; परंतु अभ्यासाच्या जोरावर त्यांनी काही वर्षे भाषाविज्ञानात काम केले. त्यांच्या लेखनात ऐतिहासिक भाषाविज्ञानावर भर दिसून येतो. वर्णनात्मक लेखन 'थोडोक व्याकरण विचार' (१९६९) ह्या पुस्तकात आहे. गुजराती भाषेच्या रूपव्यवस्था व वाक्यव्यवस्था ह्या विषयांवरील लेखांचा हा संग्रह आहे. त्यात सलग सिद्धान्ताचे प्रतिपादन नाही. त्यांचे 'गुजराती भाषानुं ऐतिहासिक व्याकरण' हे पुस्तक उल्लेखनीय आहे.



अनुक्रमणिका

त्यानंतरच्या काळात डॉ. योगेन्द्र व्यास व डॉ. शांतिभाई आचार्य ह्या दोन विद्वानांनी लेखन केले. दोघेही डॉ. पंडितांचे विद्यार्थी. डॉ. शांतिभाई आचार्य ह्यांनी स्वत:ला गुजराती बोलीभाषेच्या अभ्यासाला वाहून घेतलं. त्यांनी गुजरातीच्या जवळजवळ सर्व बोलींचा अभ्यास करून वर्णनात्मक सामग्री उपलब्ध केली. डॉ. योगेन्द्र व्यास ह्यांनी वेगळ्या प्रकारचे कार्य केले. गुजरात युनिवर्सिटीत भाषाविज्ञान विषय शिकविण्यासाठी विद्यार्थ्यांना उपयोगी सैद्धान्तिक तशीच वर्णनात्मक सामग्री गुजराती भाषेतून उपलब्ध करून देण्यासाठी त्यांनी परिश्रम केले. त्यांनी ध्वनी, रूप व वाक्यव्यवस्थेचे वर्णन 'गुजराती भाषानुं व्याकरण' ह्या पुस्तकात केले. बोलीविज्ञानासंबंधी पुस्तक लिहिले. 'भाषाविज्ञान अने भाषाशिक्षण' हे त्यांचे उपयोजित भाषाविज्ञानाचे पुस्तक पाश्चात्य सिद्धान्तांची ओळख करून देते व व्यावहारिक अनुभवांसंबंधीचे विचार मांडते. त्यांचे 'सामाजिक भाषाविज्ञान' हे पुस्तक म्हणजे गुजरातीतील ह्या विषयातील पहिले पुस्तक. त्यांनी विविध विषयांचा गुजराती विद्यार्थ्यांना सोप्या भाषेत परिचय करून दिला. भाषाविज्ञानाचे उपयोजन साहित्यकृतींच्या विवेचनात कसे होते, हेही त्यांनी अनेक लेखांतून दाखवून दिले. त्यांच्या ह्या कार्याने गुजराती विद्यार्थ्यांना भाषाविज्ञानाचा परिचय होण्यास व गोडी लागण्यास साहाय्य झाले. त्यामुळे गुजरात युनिवर्सिटीत भाषाविज्ञान विभाग टिकला व प्रगती करत गेला. त्याउलट गुजरात विद्यापीठ व साऊथ गुजरात युनिवर्सिटीतील भाषाविज्ञान विभाग विद्यार्थ्यांच्या अभावी बंद झाले. गुजरात युनिवर्सिटीत भाषाविज्ञानाची वात तेवत राहिली.

डॉ. शांतिभाई आचार्य ह्यांची व डॉ.योगेन्द्र व्यास ह्यांची प्रमुख पुस्तके खालीलप्रमाणे :

(१) 'गुजराती भाषानुं व्याकरण', योगेन्द्र व्यास, युनिवर्सिटी ग्रंथ निर्माण बोर्ड.

(२) 'भाषाविज्ञान अने भाषाकौशल्योनुं शिक्षण', योगेन्द्र व्यास, प्रयोग प्रकाशन, १९७९.

(३) 'सामाजिक भाषाविज्ञान', योगेन्द्र व्यास, गुजरात युनिवर्सिटी प्रकाशन.

(४) 'भाषा, समाज अने साहित्य', योगेन्द्र व्यास, आदर्श प्रकाशन, १९७३.

(५) 'बोलीविज्ञान अने गुजरातनी बोलीओ', योगेन्द्र व्यास, युनिवर्सिटी ग्रंथ निर्माण बोर्ड, १९७४.

(६) 'भीली शब्दावली', डॉ. शांतिभाई आचार्य, गुजरात विद्यापीठ, १९७८.

(७) 'फोनोलॉजी ऑफ कच्छी', डॉ. शांतिभाई आचार्य, १९७०.

(८) 'बोलीविज्ञान : केटलाक प्रश्नो', डॉ.शांतिभाई आचार्य, गुजराती साहित्य परिषद, १९८४.

( ९ ) 'हालारी बोली', डॉ. शांतिभाई आचार्य, गुजरात विद्यापीठ, १९८५.
(१०) 'उत्तर गुजरातनी बोलीओ', डॉ. शांतिभाई आचार्य, गुजराती, साहित्य परिषद.

ह्या दोन विद्वानांच्याशिवाय अन्य विद्वानांकडून भाषाविज्ञानाविषयी गुजराती भाषेमध्ये डॉ. प्रभाशंकर तेरैया ('द्विरुक्त प्रयोगो') आणि डॉ. जयंत कोठारी ('भाषा परिचय अने गुजराती भाषा') डॉ. के.बी. व्यास ('भाषाविज्ञान' खंड - १), डॉ. जे.सी. दवे ('भाषाविज्ञान') यांनीही ग्रंथलेखन केले आहे. ह्या पुस्तकांचा मुख्य उद्देश गुजराती भाषेच्या पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रमांत असलेल्या 'भाषाविज्ञान व गुजराती भाषा' ह्या विषयाची सामग्री विद्यार्थ्यांना उपलब्ध करून देण्याचा आहे. भाषाविज्ञान विषयातील संशोधन वा विकास यांची चर्चा ह्या पुस्तकांतून आढळत नाही.

बडोद्याच्या महाराजा सयाजीराव विद्यापीठात भाषाविज्ञानाचा विभाग आहे. पण तेथे शिक्षणाचे माध्यम इंग्रजी असल्याने त्या विभागाद्वारे गुजराती भाषेचा अभ्यास व गुजरातीतून लेखन विशेष झाले नाही. डॉ. भारती मोदी ह्यांनी चॉम्स्कीयन सिद्धान्ताची ओळख करून देणारे पुस्तक 'पश्चिममां व्याकरण मीमांसा' (गुजरात युनिवर्सिटी, १९८३) लिहिले आहे. त्यांनी नियतकालिकांतून ध्वनिव्यवस्थेविषयी लेखन केले.

दक्षिण गुजरात युनिवर्सिटी, सुरत येथे १९७६ पासून भाषाविज्ञान विभाग सुरू झाला. डॉ. दयाशंकर जोशी ह्यांचे शिक्षण अमेरिकेत झाले. त्यांच्याकडून गुजराती भाषा व भाषाविज्ञानाच्या अपेक्षा फलद्रूप झाल्या नाहीत. त्यांनी विविध नियतकालिकांतून लेखन केले. पण ते लेख गुजराती भाषेसंबंधीचे असले तरी इंग्रजीतून लिहिलेले आहेत. उदा० 'कॉझेटिवायझेशन इन गुजराती' (१९७०), 'गुजराती कर्नल्स - सम प्रॉब्लेम्स', 'पॅसिव्ह एटसेट्रा इन गुजराती' (१९८०)

त्याचप्रमाणे डॉ. पुरुषोत्तम मिस्त्री ह्यांनी अमेरिकेत राहून गुजराती भाषेवर कार्य केले. चॉम्स्कीच्या 'आस्पेक्टस ऑफ ए थिअरी ऑफ सिंटॅक्स'मधील सिद्धान्ताचा आधार घेऊन त्यांनी लिहिलेले 'गुजराती व्हर्बल कन्स्ट्रक्शन्स', (१९६८) व 'सब्जेक्ट इन गुजराती - ॲन एक्झामिनेशन ऑफ व्हर्ब ॲग्रिमेण्ट' (१९७८) उल्लेखनीय आहेत.

श्री. ना.दा.ठा. युनिवर्सिटी (मुंबई) येथे गुजराती भाषेचा अभ्यास करून गुजरातीतून लेखन करणाऱ्या लेखिका डॉ. ऊर्मी देसाई ह्यांचे काम उल्लेखनीय आहे. त्यांच्या अभ्यासाचा नंतरच्या काळातील रोख 'टॅग्मेमिक ग्रॅमर'कडे आहे. ह्या सिद्धान्ताची रूपरेखा व गुजराती भाषेचे वर्णन त्यांनी दिले. त्यांची 'वाक्यविचार' व्याख्यानमाला - फार्बस गुजराती सभेच्या त्रैमासिकातून प्रकाशित झाली (१९८६-८७). त्यांचे अन्य एक पुस्तक 'व्याकरण विमर्श' पण ह्याच दिशेतील प्रयत्न आहे. मात्र परिभाषेच्या अतिरेकाने त्यांचे लेखन विद्यार्थ्यांना आकलनसुलभ वाटत नाही.



अनुक्रमणिका

गुजरात युनिवर्सिटीतील भाषाविज्ञान-विभागात कार्यरत असलेल्या डॉ. अरविंद भांडारी ह्यांनी आधुनिक भाषावैज्ञानिक सिद्धान्त व संस्कृत व्याकरणपरंपरा ह्यांच्या समन्वयाने वाक्यरचनेचे सिद्धान्त स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला. त्यांची 'गुजराती विभक्तीविचार' (१९८७) व 'गुजराती वाक्यरचना' (१९९२) ही दोन पुस्तके प्रकाशित झाली आहेत. गुजराती भाषेच्या वाक्यरचनेच्या नवीन विचाराचा पाया प्रबोध पंडितांच्या 'व्याकरण-अर्थ अने आकार' ह्यात दिसतो. त्या पायावरील इमारतीचे बांधकाम करण्याचा प्रयत्न डॉ. भांडारी ह्यांच्या लिखाणात आहे.

कोशविषयक सैद्धान्तिक विवेचन करणारे एक पुस्तक डॉ. योगेन्द्र व्यास व डॉ. पिंकी शाह ह्यांनी (१९९९) लिहिले आहे : 'कोशरचना अने जोडणी', पार्श्व प्रकाशन, अहमदाबाद.

भाषा व भाषाविज्ञान ह्या विषयांसाठीच असे गुजराती नियतकालिक डॉ. ह. चू. भायाणि ह्यांच्या संपादनाखाली गुजराती साहित्य परिषदेने सुरू केले. 'भाषाविमर्श' ह्या नियतकालिकात (१९७८-८९) प्रामुख्याने भाषेवर व भाषाविज्ञानावर लेख प्रकाशित करण्यात येत. त्यात मुख्यत्वे डॉ. भायाणिंचे लेख असत.

ह्याव्यतिरिक्त गुजरात युनिवर्सिटीच्या 'विद्या' नावाच्या नियतकालिकातही भाषा-विज्ञानावरील लेख २५ वर्षांच्या काळात प्रकाशित झाले. मुंबई येथील 'फार्बस' त्रैमासिक, अहमदाबाद येथील 'बुद्धिप्रकाश', गुजराती साहित्य परिषदेचे मुखपत्र 'परब', तसेच 'तादर्थ्य' ह्या नियतकालिकांतून अधूनमधून भाषा व भाषाविज्ञानाचे लेख प्रकाशित होतात. पण अलीकडच्या काळात हा प्रवाह देखील अत्यंत क्षीण झाला आहे. केवळ भाषा व भाषाविज्ञान ह्या विषयाचे मासिक/त्रैमासिक ह्याचा विचार सुद्धा करता येण्याजोगी परिस्थिती राहिलेली नाही.

आज गुजरात राज्यातील दोन युनिवर्सिटींमध्ये भाषाविज्ञानाचे विभाग आहेत : बडोदे येथील महाराजा सयाजीराव युनिवर्सिटी ऑफ बरोडा व अहमदाबाद येथील गुजरात युनिवर्सिटी. ह्या दोन्ही युनिवर्सिटी एकाच साली (१९४९) स्थापन झाल्या. गुजरात युनिवर्सिटीने गुजराती माध्यम स्वीकारले; तर म.स. युनिवर्सिटीने इंग्रजी. म. स. युनिवर्सिटीत पदवी व पदव्युत्तर भाषाविज्ञानाचे अभ्यासक्रम उपलब्ध आहेत. ह्या युनिवर्सिटीत एकच विभाग दोन्ही अभ्यासक्रम चालवू शकतो; कारण त्यांना संलग्न महाविद्यालये नाहीत. गुजरात युनिवर्सिटीत पदव्युत्तर अभ्यासक्रम आहेत. अन्य भाषांबरोबर गौण विषयाचा दोन पेपर्सचा अभ्यासक्रम व चार पेपर्सचा पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रम. शिवाय एम.फिल व पीएच.डी. हे अभ्यासक्रमही उपलब्ध आहेत. ह्या दोन्ही विभागांत २-३ अध्यापक असतात. ह्या दोन्ही विभागांत सरासरी

२०-२५ विद्यार्थी असतात. करिअरच्या दृष्टीने भाषाविज्ञानाकडे वळणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या बोटावर मोजता येईल एवढीच.

सुरत येथील वीर नर्मद युनिवर्सिटीत १९८०मध्ये भाषाविज्ञान विभाग सुरू झाला. तीन अध्यापक होते. १९८८मध्ये विद्यार्थ्यांच्या अभावी ह्या विभाग बंद करण्यात आला. अहमदाबाद येथील गुजरात विद्यापीठात गुजराती विभागात पदव्युत्तर स्तरावर आधुनिक भाषाविज्ञान शिकविले जायचे. डॉ. शांतिभाई आचार्यांच्या निवृत्तीनंतर भाषाविज्ञान जाणणाऱ्याची नेमणूक झालेली नाही.

हे चित्र आहे सध्याच्या विभागांचे. अध्यापक व विद्यार्थी दोहोंची कमतरता. त्यामुळे विशेष परियोजना व संशोधन ह्यांना पण पाहिजे तेवढा वाव मिळत नाही. गुजरात युनिवर्सिटीच्या विभागातील डॉ. योगेन्द्र व्यास व डॉ. अरविंद भांडारी ह्यांनी ठिकठिकाणी व्याख्याने देऊन आधुनिक भाषाविज्ञानाचा प्रचार व प्रसार केला. अनेक विद्यार्थ्यांत ह्या विषयाची ओढ निर्माण केली. परंतु ह्या विषयात करिअरच्या संधी कमी असल्याने प्राथमिक अभ्यासापलीकडे विद्यार्थी जात नाहीत. आजतागायत ७०० च्या आसपास विद्यार्थ्यांनी भाषाविज्ञानाचे शिक्षण घेतले.

त्यापैकी ५ विद्यार्थ्यांनी डॉक्टरेट मिळविली. ह्या विद्यार्थ्यांचे विषय : (१) भिली बोली (२) गुजराती व मराठी तुलनात्मक अध्ययन (३) संस्कृत कर्तरी, कर्मणी व भावे रचना (४) मूलभूत ध्वनितरंग (फ्रीक्वन्सी) (५) गुजराती सहायक धातू.

गुजरात युनिवर्सिटीच्या विभागात चालणारा पदविका अभ्यासक्रम शनिवार रविवारी चालतो. ह्या अभ्यासक्रमात विविध भाषांचे अनेक शालेय व महाविद्यालयीन शिक्षक/अध्यापक येतात, भाषाविज्ञानाचे पायाभूत शिक्षण मिळवितात व त्याचा उपयोग त्यांना भाषा व व्याकरण यांच्या अध्यापनात चांगला होतो असा अनुभव आहे. पण त्यातून संशोधनाकडे वळणारे विद्यार्थी मोजकेच. साहित्य व भाषा ह्यांपैकी साहित्याकडे कल जास्त. भाषाविज्ञान अवघड वाटते. त्याशिवाय गुजरात युनिवर्सिटीत पदवीस्तरावर भाषाविज्ञान विषय संलग्न महाविद्यालयांमधून शिकविला जात नसल्याने ह्या विषयाकडे विद्यार्थी वळत नाहीत. युनिवर्सिटीने गुजराती माध्यम स्वीकारलेले आहे. विद्यार्थ्यांना इंग्रजी पुस्तके वाचण्याचा सराव नसल्याने अभ्यास-सामग्री मिळणे शक्य होत नाही. गुजराती भाषेतील उपलब्ध सामग्री कितीही केले तरी तोकडीच पडते. अध्यापकांची संख्या कमी असल्याने त्यांना लेखनासाठीची फुरसद कमी. अध्यापक सामग्री तयार करेपर्यंत भाषाविज्ञान पुढे गेलेले असते व नवे सिद्धान्त आलेले असतात. इंग्रजी माध्यमाचा एक मोठा तोटा म्हणजे स्थानिक भारतीय भाषांचा अभ्यास व गोडी नसणे. केवळ इंग्रजी व सैद्धान्तिक अभ्यासावर जोर दिला जातो. त्यामुळे भारतीय





अनुक्रमणिका

भाषांच्या अभ्यासातून निर्माण होणारे सिद्धान्त अस्तित्वात येत नाहीत. अनुकरणात्मक सामग्रीच जास्त सापडते. ह्याचा एक परिणाम असा होतो आहे की भारतीय भाषांचे विभाग व भाषाविज्ञान विभाग एका दिशेने जात नाहीत. भाषांचे विभाग व शालेय शिक्षण ह्यांतील संकल्पना अजून संस्कृत किंवा पारंपरिक व्याकरणाच्या सिद्धान्तावरच अवलंबून आहेत. आधुनिक व नवीनतम सिद्धान्तांचा त्यांना स्पर्शसुद्धा नाही. त्यामुळे भाषाविज्ञान विभाग एकलकोंडे वाटतात.

गुजरातमधील अनेक विद्यापीठातील गुजराती, हिंदी, इंग्रजी व संस्कृत भाषांच्या अभ्यासक्रमांत भाषाविज्ञानाचा एक पेपर शिकविला जातो. त्यातील मुद्दे व समजुती कालबाह्य झालेल्या आहेत. ते मुद्दे शिकविणारे अध्यापक भाषाविज्ञान जाणत नाहीत. केवळ अभ्यासक्रम पूर्ण करायचा म्हणून केला जातो. नोट्स दिल्या जातात. घोकून परीक्षा पास केल्या जातात. भाषेच्या अभ्यासाची गोडी निर्माण होत नाही. भाषाविज्ञान विषय भाषांच्या विभागांत अत्यंत नीरस व रुक्ष मानला जातो. ह्याला कारणीभूत भाषाविज्ञानाचे अध्यापक व भाषांचे अज्ञ अध्यापक दोघेही आहेत. भाषाविज्ञानाचे लेखन सोपे व रसाळ करणे आवश्यक आहे. नव्या नव्या पारिभाषिक संज्ञांचा भडिमार केल्याने त्याकडे लोक फार तर आदराने पाहतील, दुरून नमस्कार करतील; परंतु भाषेच्या अभ्यासाकडे वळणार नाहीत.

गुजराती भाषेच्या अभ्यासासाठी स्वतंत्र संस्था नाहीत. गुजराती साहित्य परिषद व साहित्य अकादमी आणि अनेक विभाग ह्यांवर साहित्यिकांचे वर्चस्व आहे. भाषेच्या अभ्यासासाठी एखादे पारितोषिक सुद्धा दिले जाते. परंतु ह्या संस्थांतून भाषा-संशोधकाची एखादी जागा निर्माण होत नाही. गुजराती साहित्य परिषद प्रतिवर्षी 'के.बी. व्यास स्मृतिव्याख्यानमाले'चे आयोजन करते. ही व्याख्यानमाला भाषाविज्ञान विषयावर असते. मुंबईला गुजराती 'फार्बस सभा' सुद्धा अशी व्याख्यानमाला योजते. गुजराती साहित्य परिषद भाषाविज्ञान व व्याकरण क्षेत्रातील उत्तम पुस्तकांना (१) डॉ. बेचरदास दोशी पारितोषिक (२) डॉ. प्रभाशंकर तेरैया पारितोषिक (रु. १०००/-) देते. गुजराती साहित्य अकादमी भाषाविज्ञान व व्याकरण विषयांतील पुस्तकांस रु. ५०००/-, रु. ३०००/-, रु. २०००/- असे पुरस्कार देते. २००५ मध्ये स्थापण्यात आलेली 'गुजराती भाषा परिषद' गुजराती शुद्धलेखन सुधारण्याचे काम करीत आहे. नव्या, सोप्या लेखनाकडे वळविण्याची मोहीम चालवत आहे.

गुजरात सरकारचा 'भाषा नियामक' विभाग १९६१पासून एक नियतकालिक- 'राजभाषा' - प्रकाशित करतो. शिवाय विविध गुजराती कोशांच्या निर्मितीचे काम पण करतो.

गुजराती भाषेचा सुशिक्षित वर्ग भाषावैज्ञानिक दृष्टिकोणापासून बराच दूर आहे. अनेक वर्षांपासून लेखन-नियम सुधारण्याविषयी साहित्यिक मासिकांतून किंवा वृत्तपत्रांतून जे लिखाण किंवा मते येतात त्यांत वैज्ञानिक वा तार्किक विचार क्वचितच आढळतो. व्याकरणविषयक किंवा भाषेच्या वापराविषयी जी काळजी असायला पाहिजे ती आढळत नाही. वृत्तपत्रांची भाषा व शुद्धलेखनाचे स्तर ढासळले आहेत. त्यावर इंग्रजी व हिंदी शब्दांचा प्रभाव वाढत आहे. शुद्धलेखनाचा आग्रह बाळगला जातो; पण छापलेल्या साहित्यात तो दृष्टिपथात क्वचितच येतो. ह्या विषयीची काळजी वृत्तपत्रांतून व्यक्त केली जाते; पण त्याच वृत्तपत्रात त्याविषयी काळजी घेतलेली दिसत नाही. सुशिक्षितांचा आणि बऱ्याचदा शिक्षक/अध्यापकांचा शब्दकोश वापरण्याकडे कल दिसत नाही. बऱ्याच जणांच्या संग्रहात त्याचा समावेश सुद्धा नसतो ! ह्या एकंदर नैराश्यपूर्ण चित्राला जबाबदार कोण हे सांगणं फार कठीण आहे. एकंदर गुजराती जनता जितकी व्यवहाराबद्दल दक्ष आहे तेवढी भाषेविषयी आग्रही नसल्याचाच हा परिणाम असावा असे प्रथमदर्शनी वाटते.

(हा लेख तयार करण्यायाठी मला कु. अर्चना पटेल हिने मदत केली. तसेच डॉ.योगेन्द्र व्यास ह्यांची मदत व सल्ला पण उपयोगी ठरले. मी त्यांचा आभारी आहे.)

■

**प्राध्यापक, भाषाविज्ञान विभाग, गुजरात युनिवर्सिटी, अहमदाबाद.**

---

**मुखपृष्ठाविषयी :** ॲव्हरम नोम चॉम्स्की (जन्म : ७ डिसेंबर, १९२८)

या अंकाच्या मुखपृष्ठासाठी नोम चॉम्स्की या नामवंत भाषावैज्ञानिक विचारवंताची निवड केली आहे. संरचनावादी भाषाविज्ञान व वर्तनवादी मनोविज्ञान यांचे त्यांनी प्रभावी खंडन केले. निर्देशात्मक (जनरेटिव्ह) व्याकरणाच्या सिद्धांताची सांगोपांग मांडणी केली. भाषा, मानवी मन व मानवी ज्ञान यांच्यातील परस्परसंबंधाविषयीचे एक वेगळे तत्त्वज्ञानात्मक आकलन त्यांनी सादर केले. अमेरिकेचे साम्राज्यवादी परराष्ट्रविषयक धोरण व रशियातील कम्युनिस्ट हुकूमशाही यांचे ते कडवे टीकाकार असून व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाही यांचे खंदे पुरस्कर्ते आहेत. भाषाविज्ञान, मनोविज्ञान, तत्त्वज्ञान, राजकारण-समीक्षा व ज्ञानप्रक्रियांचा अभ्यास करणारी - कॉग्निटिव्ह - विज्ञाने अशा अनेक क्षेत्रांत त्यांची बुद्धी, वाणी व लेखणी संचार करते.

चॉम्स्कींनी पेन्सिल्वेनिया विद्यापीठाची पीएच.डी. मिळवून १९५५मध्ये एम.आय.टी.मध्ये अध्यापन व संशोधनास सुरवात केली. अजूनही ते तेथेच काम करतात. आतापर्यंत त्यांची ७५हून अधिक पुस्तके व एक हजाराहून अधिक लेख प्रसिद्ध झाले आहेत.

---

# पं. कवीश्वरांचे मराठीतील छंदचिन्हांबद्दलचे आक्षेप

शुभांगी पातुरकर

**मराठी भाषेतील काही छंदचिन्हे पुढीलप्रमाणे :**

(१) दंड (।) - प्रामुख्याने ओवी-अभंगात चरणविभागाचा निदर्शक म्हणून उपयोजिला जातो.

(२) अवग्रह (ऽ)- गेय मात्रावृत्तात वा लोकगीतात निःशब्द मात्रा दर्शविण्यासाठी वा विवर्धित स्वरयोजनेसाठी हे चिन्ह वापरले जाते. कविवर्य बा.भ. बोरकर, ना.घ. देशपांडे यांच्या कवितेत हे आढळून येते.

(३) यती (,) - हे स्वल्पविरामाचे चिन्ह छंदात जिव्हेष्टविरामासाठी उपयोजिले जाते. यतीच्या स्थानावरून वृत्तनिश्चिती होते, असे त्याचे महत्त्व आहे.

(४) (लघू) (।) (U)

(५) गुरू (S) (—)

यांपैकी पहिली तीन छंदचिन्हे (दंड, अवग्रह व यती) प्रचलित आणि सर्वमान्य आहेत, याबाबत दुमत वा विवाद नाहीत.

लघुगुरूंच्या चिन्हांबाबात मात्र तसे नाही. लघुगरूंसाठी अनुक्रमे (।) व (S) ही प्राचीन, आणि (U) व (— ) ही अर्वाचीन चिन्हे आहेत. मराठीचे छंदःशास्त्र मूळ संस्कृत छंदःशास्त्राच्या परंपरेपासून तयार झाले आहे. संस्कृत भाषेतील छंदः-शास्त्रावरील ग्रंथात लघुगुरूसाठी अनुक्रमे (।) व (S) या शास्त्रीय व अन्वर्थक चिन्हांचा वापर केलेला दिसतो. त्यामुळे साहजिकच मराठी छंदःशास्त्रातील प्राचीन ग्रंथांतही ही चिन्हे मूळ संस्कृत छंदःशास्त्रास अनुसरून वापरली गेल्याचे दिसून येते. अलीकडील मराठी छंदःशास्त्रातील ग्रंथांतून मात्र नवी चिन्हे स्वीकारलेली दिसतात.

या चिन्हविषयक फेरबदलाचा निषेध करणारा लेख सुप्रसिद्ध संस्कृतपंडित पं. श्रीपाद धुंडिराज कवीश्वर यांनी लिहिला आहे. 'श्रीपाद-पुण्य-स्मृतिः' समितीने प्रकाशित केलेल्या गौरवग्रंथात त्यांनी ''मराठी छंदःशास्त्रातील निर्दोषता'' या शीर्षकाचा लेख लिहून एतद्विषयक आपली नापसंती स्पष्ट शब्दात नोंदविली आहे.

त्यांच्या मते पूर्वापार चालत आलेल्या संस्कृत व प्राचीन मराठी छंद:शास्त्रात लघुगुरूंसाठी वापरण्यात येणाऱ्या चिन्हांचा त्याग करून, त्याजागी नवीन चिन्हांची योजना करण्याने परंपरेचा उच्छेद व अशास्त्रीयता हे दोष लागू होतात.

आपल्या या प्रतिपादनाच्या पुष्ट्यर्थ त्यांनी मराठेशाहीतील नामवंत कवी निरंजन माधवाच्या छंद:शास्त्रावरील 'वृत्तमुक्तावली' या ग्रंथात दिलेल्या लघुगुरूंच्या चिन्हांच्या व्याख्यांचा हवाला दिला आहे. त्या व्याख्या पुढीलप्रमाणे आहेत :

''गुरुसंज्ञा वक्र रेखा, ऋतु रेखा लघुस्थळी । प्रस्तारलेखनी आहे रीती ही ऋषिनिर्मित ।।'' याशिवाय त्यांनी आणखी दोन व्याख्या उद्‌धृत केल्या आहेत.

(१) असो वक्रो गुरुर्ज्ञेयस्तथाऽन्यो मात्रिको लघु: ।।
(केदारभट्टाचे 'वृत्तरत्नाकर')

(२) यत्रार्जवं हि लघुतां, महिमानं वक्रतेव तनुते चेत् । छंद:शास्त्र इवास्मिन् लोके सरल: सखे किमसि ?

मराठीत नव्याने लागू करण्यात आलेल्या या लघुगुरुचिन्हांच्या अशास्त्रीयतेची मीमांसा करताना त्यांनी वरील व्याख्यांचा दाखला दिला आहे. त्यांच्या मते भूमितिशास्त्राच्या रेषाविषयक तत्त्वानुसार लघू (लहान) व गुरू (मोठा) या दोन शब्दांचे वाच्यार्थ लक्षात घेता कमीत कमी अंतर दर्शविणारी सरळ रेषा गुरुचिन्हासाठी व जास्तीत जास्त अंतर असणारी वक्ररेषा लघुचिन्हासाठी वापरणे अशास्त्रीय आहे. उलट प्राचीन परंपरेच्या चिन्हात याबाबत तारतम्य बाळगले गेले असल्याने त्यात शास्त्रशुद्धता आहे. शिवाय त्यांच्या मते आजकाल सर्व माध्यमिक शाळांतून भूमिती हा विषय इयत्ता १०वी पर्यंत अपरिहार्य असल्यामुळे विद्यार्थ्यांना चिन्हांचा हा अभ्यास सुलभतेने आकलन होऊ शकतो.

या सगळ्या चिन्हविषयक अशास्त्रीय घोटाळ्याला परशुरामतात्या गोडबोले यांचे 'वृत्तदर्पण' कारणीभूत आहे असे त्यांचे मत आहे. सध्याच्या मुद्रित पुस्तकांत याच चिन्हांचा वापर केला जात असल्यामुळे साहजिकच आजच्या बहुसंख्य अध्यापकांचे व प्राध्यापकांचे प्रस्तुत बाबीतील अज्ञान दूर न झाल्याने, पाठ्यपुस्तकांतून व परीक्षा-संस्थांच्या प्रश्नपत्रिकांतूनही याच अशास्त्रीय चिन्हांना मान्यता दिली जात आहे; पण विशुद्ध विद्योपासनेच्या दृष्टिकोणातून अशा अशास्त्रीयतेचे समूळ उच्चाटण करणे अगत्याचे आहे, असे त्यांना वाटते.

या चिन्हविषयक दोषपूर्णतेची जाणीव 'महाराष्ट्र सारस्वत'कार वि.ल. भावे व 'छंदोरचना'कार डॉ. माधवराव पटवर्धन यांना होती, याचे साधार विवेचनही त्यांनी

केले आहे.

प्रचलित त्याज्य चिन्हांचा उच्छेद होऊन, पूर्वपरंपरेप्रमाणे शास्त्रशुद्ध चिन्हांच्या सार्वत्रिक प्रचारास उपयुक्त असा जो परिणामकारक उपाय डॉ. माधवराव पटवर्धन यांनी सुचविला आहे, त्याचीही दखल त्यांनी या लेखात घेतली आहे. माधवराव पटवर्धनांच्या मते परशुरामतात्या गोडबोले यांनी लघुगुरूसाठी अनुक्रमे (U), (— ) ही चिन्हे इंग्रजीतून घेतली. इंग्रजी छंदोरचनेत लघुगुरू हा भेद नसून साघात-निराघात असा भेद असल्यामुळे इंग्रजीत या दोन चिन्हांचा लोप झाला. परंतु हिंदुस्थानात मात्र आता ही चिन्हे सर्वत्र रूढ झाली आहेत. आपली पूर्वापार चालत आलेली परंपरा पाळण्याच्या दृष्टिकोणातून ही चिन्हे उलट क्रमाने म्हणजे लघुसाठी (-) व गुरूसाठी (Ո ) अशी द्यावीत असे डॉ. पटवर्धन यांनी सुचविले आहे. निर्णयसागरी वृत्तरत्नाकरपत्रिकेत ती चिन्हे (-) व (Ո ) अशी अनुक्रमे लघु-गुरूसाठी वापरली असल्याचेही ते नमूद करतात. ही शास्त्रीय चिन्हे पुन्हा प्रचलित झाल्यास ते परंपरेला धरून होईल, हे जरी खरे असले तरी एकट्यानेच ती प्रथा पाडण्याचा प्रयत्न केला तर तो फोल होतो, असेही ते म्हणतात.

आपल्या 'छंदोरचने'सारख्या मराठी छंद:शास्त्रावरील मातब्बर ग्रंथातून मात्र पटवर्धनांनी गोडबोल्यांच्या वृत्तदर्पणातील चिन्हांचाच वापर केला. वास्तविक वृत्त-जाति-छंद असे पद्यरचनेचे त्रिविध रूप शोधून ते विस्ताराने दाखवून देण्याचे तसेच 'पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना' हा महत्त्वाचा सिद्धांत मांडून तो सर्व पद्यरचनेला लावून दाखविण्याचे अपूर्व कार्य करणाऱ्या डॉ. पटवर्धनांना, पूर्वापार चालत आलेली शास्त्रीय चिन्हे पुन:प्रतिष्ठित करणे सहज शक्य होते. ज्यांनी वृत्तांचे वर्गीकरण प्राचीन छंद:शास्त्रज्ञांप्रमाणे, अक्षरसंख्येप्रमाणे न करता अंतर्गत मोडणीच्या साम्याप्रमाणे अभिनव पद्धतीने केले; वृत्त-जातींच्या नामांचा माजलेला घोटाळा जवळजवळ नाहीसा केला; जातिविषयक व छंदोविषयक चर्चा करणारी स्वसंशोधित व स्वरचित अशी सस्पष्टीकरणात्मक प्रकरणे ग्रंथात गोविली, अशा डॉ. पटवर्धनांना आपल्या ग्रंथमाध्यमातून ही अशास्त्रीय व परंपरेला सोडून असलेली चिन्हव्यवस्था उच्छेदणे सहज शक्य होते. तिच्या जागी पारंपरिक शास्त्रीय चिन्हव्यवस्था आणून तो पायंडा त्यांना रूढही करता आला असता.

त्यांनी असे केले नाही याचे एक कारण संभवते. त्यांनी 'छंदोरचना' ग्रंथातील 'छंद:शास्त्राचा इतिहास' या प्रकरणात परशुरामतात्या गोडबोले यांच्या 'वृत्तदर्पण' या पुस्तकाचा परामर्ष घेतला आहे (पृ. ५६१). त्यात डॉ. पटवर्धन म्हणतात, की 'वृत्तदर्पण' हे सुबोध व एकमेवाद्वितीय शालेय पुस्तक म्हणून इतके सुपरिचित झाले

आहे की, सामान्यत: बोलताना, छंद:शास्त्रविवेचन करणाऱ्या कोणत्याही पुस्तकाला 'वृत्तदर्पण' म्हणण्याची पद्धत रूढ झाली आहे. म्हणूनच त्यांनी आपल्या 'छंदोरचने'तही वृत्तदर्पणमधील छंदोविषयक चिन्हे कायम ठेवली असावीत. रूढ झालेल्या प्रघाताच्या विरुद्ध तेही जाऊ शकले नसावेत. त्यानंतर 'छंदोरचने'चा ठसा असा काही पक्का झाला की, आज तीच चिन्हव्यवस्था सर्वत्र प्रचलित झालेली दिसते - ती अशास्त्रीय व अपारंपरिक असली तरी ! 'शास्त्रादपि रूढीर्बलियसि !' हे वचन इथेही लागू पडले आहे.

आज भाषावृक्षाची छंद:शाखा काहीशी उपेक्षित भासते आहे. छंद:शास्त्राचा अभ्यास मंदावला आहे. काव्य उदंड असले तरी छंद:शास्त्रविषयक समज व गरज उणावली आहे. मुक्तछंदाच्या जमान्यात जुने गणलेखन मागे पडले आहे. वृत्तबद्ध कवितालेखन करणारे कवीही विरळा झाले आहेत. अशावेळी लघुगुरूविषयक निर्णयाची काही गरज पडलीच तर अभ्यासक प्राचीन संस्कृत वा निरंजन माधवकृत 'सद्‌वृत्तावली'कडे वळण्यापेक्षा 'वृत्तदर्पण' वा 'छंदोरचने'कडे संदर्भासाठी वळतील. अशा वेळी चिन्हविषयक मतभेदांचा बागुलबुवा उभा करून गलबला माजविण्यापेक्षा डॉ. पटवर्धनांनी घालून दिलेली घडी कायम ठेवणे काळाच्या दृष्टीने हितावह ठरणार आहे. आपल्याला पटली नाही तरी तीच चिन्हव्यवस्था कायम ठेवावी लागणार आहे.

आपल्या काव्यशास्त्रातील छंदचिन्हे, काव्यविषयक काही नियम, संकेत, परंपरा, रूढी व प्रचलितता यांकडे आजच्या काळात काहीसे दुर्लक्ष झाल्यासारखे भासते. प्रस्तुत लेखाच्या निमित्ताने काव्यशास्त्राच्या या व्याकरणीय अंगाकडे जाणकारांचे लक्ष वेधावे, हा हेतू या लेखाच्या मुळाशी आहे.

नवी चिन्हव्यवस्था आता रूढ होऊन काव्यरसिकांच्या, अभ्यासकांच्या अंगवळणी पडल्यामुळे प्राचीन चिन्हव्यवस्था शास्त्रीय असूनही पुन: रूढ होणे काहीसे कठीण आहे, असे प्रस्तुत लेखिकेला वाटते. याबाबत अधिक विचारमंथन होणे निकडीचे आहे.

■

99/B-21, सरकारी वसाहत, हाजीअली, मुंबई 400034. दूरध्वनी 022 - 24950480





अनुक्रमणिका

# 'करत' आणि 'करताना'

सुमन बेलवलकर

प्रत्येक भाषेतील धातू सुट्या रूपात एखाद्या निर्जीव यंत्राप्रमाणे असतात. त्यांना त्यांचा असा एक अर्थ असतो. परंतु त्यांना प्रत्यय लागल्याशिवाय ते कार्यरत होत नाहीत. त्यांच्याकडून काम करून घेणे, त्यावर पूर्ण नियंत्रण ठेवणे या बाबी धातूंना लागणाऱ्या प्रत्ययांच्या पूर्ण अखत्यारीत असतात. धातू आणि प्रत्यय यांनी बनलेले क्रियापद वाक्याचा काळ, अर्थ इत्यादी ठरविते. उदा० 'जातोस' हे क्रियापद फक्त द्वितीय पुरुषी, पुल्लिंगी, एकवचनी 'तू' या सर्वनामासाठी वर्तमानकाळात वापरले जाते. याशिवाय काही प्रत्यय लागून तयार होणारी धातुसाधिते वाक्यांमध्ये विशेषणाचे किंवा क्रियाविशेषणाचे काम करतात. 'धुतलेले कपडे' आणि 'तो हात धुवायला गेला आहे.' ही अशी उदाहरणे म्हणता येतील. धातुसाधितांची घडण आणि त्यांच्याशी निगडित संकेत हे या प्रत्ययांवरून ठरत असतात. तो खेळायला जातो, खेळून घरी येतो आणि हॉकी खेळायचं ठरवतो या धातुसाधितांची योग्य निवड करून त्यांचा वापर करणे स्वभाषकांना आपोआप जमते. परभाषकांना भाषा शिकवताना मात्र त्यांची नि:संदेह कोष्टके द्यावी लागतात. नाहीतर त्यांचा गोंधळ होतो.

याविषयी निमित्त झाले ते आजकाल वृत्तपत्रातील भाषेत आढळणाऱ्या अशा रूपांच्या स्वैर भेसळीचे. सध्या क्रिकेटबद्दल भरपूर लिहिले जाते आहे. साधारणपणे अशी भाषा सर्वच वृत्तपत्रांमध्ये पहायला मिळते. नमुन्यादाखल 'सकाळ' या वृत्तपत्राच्या दिनांक २० मार्च २००७च्या अंकातील वार्तांकनाची भाषा पाहू. (अन्य वृत्तपत्रे याला अपवाद नाहीत.)

**संच पहिला -**

पृ. १ - बर्म्युडाच्या डेव्हिड हॅम्प याने किल्ला लढविताना अर्धशतकी खेळी केली.

पृ. ८ - चांगली सुरुवात करताना हॉलंडच्या सलामीवीरांनी ३६ धावा जमवल्या.
- तत्पूर्वी प्रथम फलंदाजी करताना... सराव करून घेतला.
- हॉजने तर... शतक पूर्ण करताना... चौकार खेचले.

पृ. १० - क्रिकेटमधली आपली सर्वोच्च धावसंख्या उभारताना ... इतिहास मोडून काढला.

→ - बर्म्युडाच्या गोलंदाजीचा पालापाचोळा करताना... फलकावर लावले.

- आपापली अर्धशतके पुरी करताना... भागीदारी केली.(स्तंभ २)

→ - सेहवागने... बॅडपॅच संपविताना... शतकी खेळी केली.(स्तंभ ३)

→ - सचिनने... भूमिका पार पाडताना अर्धशतक पूर्ण केले.(स्तंभ ६)

पृ. ११ - त्याने १२१ चेंडूंचा सामना करताना... चौकार मारला.

→ - ८८ चेंडूंचा सामना करताना... चौकार खेचले.(स्तंभ ५)

याच वृत्तांकनांमध्ये दुसऱ्या प्रकारची रचनाही केलेली आढळते.

संच दुसरा -

पृ. ८ - हॉलंडचा संघही... सिद्ध करत... त्यांचा पराभव केला.

पृ. १० - त्याला योग्य साथ देत गांगुलीने... बहर सिद्ध केला.

- युवराजने मिळालेल्या संधीचा पुरेपूर लाभ घेत.. फोडून काढली.

पृ. ११ - त्याला योग्य साथ देत सीन विल्यम्सने...

- टेलरने अर्धशतकी खेळी करत... डाव सावरला.

- चिंगुंबुराने नाबाद ३० धावांची खेळी करत... चौकार मारले.

या दोन संचांमधील वाक्ये काळजीपूर्वक वाचल्यावर लक्षात येते, की पहिल्या संचातील क्रियापदांना लावलेला 'ताना' हा प्रत्यय योग्य नाही. एखादी मुख्य क्रिया करताना त्याचवेळी दुसरी सहज शक्य असलेली गौण क्रिया असल्यास त्यांचा मेळ घालतेवेळी मुख्य क्रियापदाला 'ताना' प्रत्यय लागतो आणि गौण क्रियेचे वाक्य त्याला जोडले जाते. उदा०

सिनेमा पाहताना मी शेंगा खात होतो. किंवा

अंघोळ करताना तो गाणी म्हणतो.

हीच वाक्ये 'त' प्रत्यय लावून अशी होतील -

मी शेंगा खात सिनेमा पहात होतो.

तो गाणी म्हणत अंघोळ करत होता.

इथे मुख्य क्रिया नंतरच्या वाक्यातून व्यक्त होते.

अर्थात 'त' आणि 'ताना' यांची आलटापालट सर्वच ठिकाणी शक्य नसते. प्रसंग, परिस्थिती, कृतीप्रमाणे या प्रत्ययांची निवड करावी लागते. उदा०

'घाईघाईने चपला घालत ती बाहेर पडली', हे वाक्य.

'तिने बाहेर पडताना घाईघाईने चपला घातल्या' किंवा

'तिने घाईघाईने बाहेर पडताना चपला घातल्या' असे बनवले तर त्याचा तोल बिघडतो.

तसेच 'आईने मरताना मुलाकडून वचन मागितले.' हे वाक्य 'मुलाकडून वचन मागत आई मेली' असेही होणार नाही. 'त' प्रत्यय लावलेले धातुसाधित वापरताना दुसराही एक विचार करावा लागतो, तो दोन क्रियांमधील क्रमाचा ! आधी काय घडले आणि त्याची परिणती कशात झाली किंवा त्याचे वर्णन शैलीदार भाषेत कसे करता येईल यानुसार 'त'ची योजना ठरते. डेव्हिड हॅम्पने अर्धशतकी खेळी केली याला गौरवाने किल्ला लढविला असे म्हणता येईल त्याचप्रमाणे सलामीवीरांनी आधी ३६ धावा जमवल्या; त्याचे पर्यवसान चांगली सुरुवात होण्यात झाले. हा निकष लावला तर पहिल्या संचातील 'तत्पूर्वी प्रथम फलंदाजी करताना ऑस्ट्रेलियाच्या खेळाडूंनी फलंदाजी आणि गोलंदाजीचा चांगला सराव करून घेतला.' हे वाक्य लेखकाने झोपेत लिहिले असावे. प्रथम किंवा नंतर फलंदाजी करणारा संघ अगदी ऑस्ट्रेलियाचा झाला म्हणून फलंदाजी आणि गोलंदाजी दोन्हीचा सराव कसा काय करू शकतो ? इतर वाक्यांना लावलेला 'ताना' प्रत्यय बदलावा लागेल. ही वाक्ये मग -

- अर्धशतकी खेळी करत... किल्ला लढविला.
- ३६ धावा जमवत... चांगली सुरुवात केली.
- हॉजने... चौकार खेचत शतक पूर्ण केले.
- भारताने मोठ्या धावसंख्येचा इतिहास मोडून काढत आंतरराष्ट्रीय एकदिवसीय क्रिकेटमधली आपली सर्वोच्च धावसंख्या उभारली.
- गोलंदाजीचा पालापाचोळा करत... शकत फलकावर लावले.
- भागीदारी पूर्ण करत... अर्धशतके पुरी केली.
- सेहवागने बॅडपॅच संपवत... शतकी खेळी केली.
- सचिनने... भूमिका पार पाडत... अर्धशतक पूर्ण केले.
- टेलरने १२१ चेंडूंचा सामना करत... चौकार मारला.

याप्रमाणे लिहिणे आवश्यक आहे. वाक्यांमधील अर्थाचा तोल, व्याकरणिक रचना आणि मराठी भाषेची शैली या सर्व दृष्टींनी ते सुसंगत आहे.

वृत्तपत्रांची भाषा लिखित स्वरूपात वाचकांसमोर येते. तिच्यात जाणता - अजाणता होणारी व्याकरणाची मोडतोड वाचकांमध्ये आपोआपच झिरपत जाते. अलीकडे वृत्तपत्रांच्या भाषेतील शुद्धलेखन, शब्दक्रम, वाक्यरचना यांच्या चुकांचे प्रमाण काळजी वाटण्याइतके वाढले आहे. 'कार्यक्रम संपन्न होणे', 'आशेवर पाणी फिरणे' या प्रकारची शब्दप्रयोग व वाक्प्रचारांची आक्रमणे थोपवता येत नाहीत; त्यांनी भाषा

समृद्धच होते असे मानून त्यांचे स्वागत करावे, असाही वृत्तपत्रवाल्यांचा एक तकलुपी युक्तिवाद असतो. जणू काही वरील शब्दप्रयोगांना मराठीत पर्याय उपलब्धच नाहीत. 'साजरा होणे', 'विरजण पडणे'सारखे वाक्प्रयोग या रेट्यात हाकलून दिले जातात, हे आपल्या लक्षात येत नाही. 'गट्स्'ला मराठी शब्द आठवत नाही म्हणून मराठीत 'गट्स्' नाहीत, मराठी माणसात धमक नाही असे म्हणण्यासारखेच हे आहे. शाब्दिक पातळीवर एक वेळ हे क्षम्य आहे; पण वाक्यरचनेचे, व्याकरणाचे, शैलीचे नियम हा मोडतोडीचा विषय होऊ शकत नाही. भलतेच अर्थ व्यक्त करणाऱ्या अशा प्रकारच्या वाक्यरचना भाषेत निष्काळजीपणे फेकून देणे हा भाषिक नागरिकत्वाच्या दृष्टीने अपराधच आहे. वाचकांची भाषा बिघडविण्याचे पाप आपल्या हातून होऊ नये म्हणून त्यांनी विशेष जागरूक रहायला हवे. ■

**एफ-४४, सुंदरनगरी, ३०८, सोमवार पेठ, पुणे 411 011. दूरध्वनी 26111113**

---

## कल्पनासाम्य

**श्री. बा. जोशी**

एखादा कवी एकच कविता अशा काही बहारीनं लिहून जातो, की त्याचे बाकीचे काव्य विसरले जाऊन तो त्या कवितेचा कर्ता म्हणूनच लोकमानसात घर करतो. 'एकज दे चिनगारी' ही आर्त विनवणी लिहिणारे हरिहर भट्ट हे गुजराती कवी अशा कोटीतले. 'हृदयनिर्झर' नामक त्यांचा कवितासंग्रह आज दुर्मीळ नि विस्मृत ठरला आहे; पण 'एकच ठिणगी द्या मज प्रभुजी' हे भजनसदृश गीत गुजरातेत घरोघर पोचले आहे. उमाशंकर जोशी यांनी 'निश्वेना महेलमा' या निबंध संग्रहात या कवनाचे रसग्रहण करताना हरिहरभाईंना 'एक काव्य-कवी' म्हटले आहे. १९३२मध्ये असहकारिता आंदोलनात उमाशंभर नि हरिहर विसापूरच्या तुरुंगात एकत्र होते. त्यामुळे व्यक्तिगत परिचय निकटचा. हरिहरभाई विद्वान नव्हते, पण हृदयवान होते. या कवितेत 'चंदा उजळला, सुर्जा उजळला, उजळली नभडंबरी' अशा आशयाची ओळ उद्धृत करून उमाशंकर लिहितात, ''गॉल्सवर्दीच्या एका नाटकात 'यू लाइटेड द सन, यू लायटेड द स्टार्स' असे शब्द एका गीतात येतात नि तीच कल्पना व्यक्त करतात. हरिहरभाई कुठले गॉल्सवर्दी वाचायला गेले होते?' अशी साम्यस्थळे इकतंच सुचवतात, की काही कल्पना वेगवेगळ्या भाषांतील कवींना स्वतंत्रपणे सारख्याच सुचतात. हे अनुभवाचे खंडभाग साऱ्या मानवजातीचा सामाईक वारसा बनून जातात,'' वाङ्मयाच्या आस्थेवाईक अभ्यासकांनी अधिक सुजाणपणे अशा साम्यस्थळांचा आस्वाद घ्यायचा नि मनाची संस्कृती अधिक संपन्न करायची ! ■

**''गंगाजळी'' : २ मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई २००६, पृ. २१५-२१६**

---

# वैद्यकीय ज्ञान आणि समाजाचे प्रबोधन

ह.वि. सरदेसाई

वैद्यकाचा आणि माणसाचा संबंध जुना आहे. कदाचित मानवाच्या भूतलावरील आगमनापासून असावा. आजही २५ वर्षांच्या कालावधीत प्रौढ व्यक्तीला एक मोठा (रुग्णालयात दाखल व्हावे लागेल अशा तीव्रतेचा) २० वेळा दखलपात्र (कामावर जाणे अशक्य करणारा), २०० वेळा त्रासदायक (डॉक्टरांच्याकडे जास्त औषध आणावे लागेल असा) आणि १००० वेळा (घरगुती उपायांनी बरा होणारा) लहानसा आजार होतो. जन्माच्या वेळेपासून हॉस्पिटल, डॉक्टर्स, परिचारिका (क्वचित शस्त्रक्रिया : सिझेरियन) यांची संगत लागते, ती इहलोकाची यात्रा संपविण्याच्या वेळेपर्यंत, ही वेळ लांबावी म्हणून अथवा देहत्यागाची वेदना कमी व्हावी म्हणून चालू असते. असे असले तरी आपापल्या विषयात पारंगत असणाऱ्या इतर शाखांच्या ज्ञानवंतांना सुद्धा वैद्यकीय समस्यांचे स्वरूप किंवा त्यांचे उपचार यांचे आकलन झालेले नसते, असा माझा अनुभव आहे. आपल्या आजारातून लवकर आणि परिपूर्ण बरे होण्याकरिता आपल्या शरीररचनेची, शरीरक्रियांची, आजारांमुळे यांत होणाऱ्या बदलांची, उपचारांचे नेमके काय परिणाम होतात याची व स्वतः काय करावयाला पाहिजे याची माहिती असणे आवश्यक असते. आजारपणात आपली जीवनशैली (आहार, विहार, आचार आणि विचार) कशी असावी आणि पुन्हा आजारी पडू नये याची खबरदारी कशी घ्यावयाची याचे ज्ञान प्रत्येकाला होणे आवश्यक आहे. आपण करीत असणारे (मग ते तज्ज्ञ डॉक्टरांच्या सल्ल्याने असले तरी) उपाय आपल्याला काही अपायही करू शकतात, याचीही जाणीव असावी लागते. गेल्या अर्धशतकात सर्वच क्षेत्रांतील ज्ञानाच्या झालेल्या स्फोटाचा परिणाम म्हणून, आता वैद्यकीय व्यावसायिकांच्या हातात प्रभावी उपचार पद्धती उपलब्ध झालेल्या आहेत. अनेक कष्टसाह्य वा असाह्य आजार आता बरे करता येतात. यासाठी वापरण्यात येणारे रासायनिक रेणू, शस्त्रक्रिया, विविध किरणांचे वापर (रॅडिएशन) आजार घालवतांना शरीराच्या काही पेशींना देखील अपाय करू शकतात. अशा अपायांपासून झालेल्या विकारांना आयाटेरोजेनिक डिसीझेस (Iatrogenic : iatro-Greek-iatros physician. Gennan - Greek - to produce) असे

नाव आहे. यांचा अभ्यास ही वैद्यक शास्त्रातील नव्याने निर्माण झालेली पण वेगाने वाढणारी शाखा आहे. वैद्यकशास्त्राच्या सर्वच शाखा उपशाखांमधे गेल्या दीड-दोन शतकांत अभूतपूर्व वाढ झालेली आहे. ज्ञानाच्या सर्व शाखांत प्रावीण्य असणारी व्यक्ती आता शक्य नाही, वैद्यकशास्त्र पूर्ण जाणणे असंभवनीय आहे. एखाद्या उपशाखेतील होणाऱ्या प्रगतीची देखील जाण असणे दुर्मीळच ठरेल. किमान मूलभूत तत्त्वे माहिती असावीत यासाठी समाजाचे प्रबोधन आवश्यक वाटल्याने मी मराठीतून लिहावयास सुरवात केली.

वैद्यकीय ज्ञानाचे स्रोत इंग्रजी भाषेत आहेत. इंग्रजी जाणणाऱ्यांनासुद्धा तांत्रिक शब्दांचे अडथळे पार पाडून ज्ञान मिळवणे कठीण असते. ज्ञान हा एक अनुभव असतो. कोणताही विचार समजणे हा ज्ञानाचा गाभा असतो. भाषा हे विचारांच्या देवाण-घेवाणीचे माध्यम असते. शब्द हा भाषेचा एकक असतो. शब्दांना अर्थ असतो. मुळाक्षरांना अर्थ नसतो. अर्थ नसलेल्या मुळाक्षरांच्या एकत्र येण्याने निर्माण झालेल्या ध्वनीला अर्थ देणाऱ्या शक्तीला 'मातृका' शक्ती म्हणतात. ही मातृका शक्ती म्हणजे समाजमान्यता होय. शब्दांना आलेले अर्थ समाजमान्यतेनेच निर्माण होतात. याच नाण्याची दुसरी बाजू समाजाला समजतील असेच शब्द वापरले तर ज्ञान समाजात पोहोचेल. या विचाराने या प्रबोधनाच्या कार्यास सोपी भाषा वापरावयाचे ठरविले. शब्द नेहमीच्या वापरातील असावेत. वाक्ये लहान असावीत असेही ठरविले. कधीकधी पर्यायी इंग्रजी शब्द अधिक परिचयाचा असेल असे वाटण्यास तांत्रिक मराठी शब्दाला इंग्रजी पर्यायही कंसात लिहावयाचे ठरविले. 'इन्सुलिन इन प्रोड्युस्ड ॲण्ड सीक्रीटेड बाय दि बीटा सेल्स ऑफ दि पॅन्क्रियास' याचे भाषांतर करताना ''स्वादु-पिंडातील (पॅन्क्रियाज) बीटा पेशी द्विपिन(इन्सुलिन) नावाचे संप्रेरक (हॉर्मोन) निर्माण करतात व स्रवतात'' असे लिहावयाचे ठरविले. वाक्य वाचताना त्याचा बोध लवकर होणे हेच ध्येय ठेवून लिहावयाचे ठरविले. इंग्रजी भाषेत वाक्याची रचना व मराठी वाक्याची रचना भिन्न असते याचे भान न ठेवल्यास वाक्य बोजड होते याचेही भान ठेवले.

सुरवातीच्या काळात व्याख्यान आधी इंग्रजीत लिहून काढीत असे. माझ्या व्याख्यानाचे विषय वैद्यकीय होते आणि आजही बव्हंशी आहेत. या विषयावर अद्ययावत माहिती इंग्रजीतील प्रकाशनांतून उपलब्ध होई. ती एकत्रित केली की त्याचे सोप्या मराठीत भाषांतर करणे ही दुसरी पायरी असे. वापरातील साध्या इंग्रजी शब्दांना योग्य मराठी शब्द लगेच सुचत नसत. अशा वेळी इंग्रजी-मराठी शब्दकोश पाहणे आवश्यकच होई. 'युवर ब्लड शुगर इज नॉर्मल' या पाच शब्दांच्या वाक्याचे भाषांतर करताना 'आपली रक्तशर्करा नेहमीच्या पातळीवर आहे' या पाच शब्दांत करण्याने योग्य अर्थबोध

होणार नाही. 'रक्तशर्करेच्या सुदृढ प्रकृतीमधे ठरलेल्या पातळ्यांच्या मर्यादा सांभाळून राहात आहे.' हे वाक्य अर्थाच्या दृष्टीने अधिक बरोबर असले तरी ऐकावयाला बोजड वाटते. विचारांती असे ठरविले की 'आपली रक्तशर्करा यथायोग्य पातळीवर आहे' या पाच शब्दांच्या वाक्याचा उपयोग करावा. तसेच रक्तवाहिन्यांसाठी वापरलेला 'शिरा' हा शब्द नर्व्हज या अर्थी सुद्धा वापरला जातो. रक्तवाहिन्यांसाठी 'नीला' व 'रोहिणी' हे शब्द आता सर्वांना समजतात.

नर्व्हजसाठी 'मज्जातंतूच्या शिरा' असे लिहून अधिक स्पष्ट अर्थबोध होईल असे वाटले. यासाठी कोणतेही वाक्य पाच किंवा सहा शब्दांपेक्षा मोठे असू नये व शक्यतो कोणताही शब्द तीन किंवा चार अक्षरांपेक्षा मोठा नसावा, जोडाक्षरे टाळावीत असे ठरविले. संपूर्ण भाषण या पद्धतीने लिहून काढीत असे. ते ३-४ वेळा लक्षपूर्वक वाचीत असे. प्रत्यक्ष बोलतांना काहीही वाचत नसे. भाषण हा एक संवादाचाच भाग असावा, त्यात काही वाचावे लागू नये अशी माझी धारणा आहे.

सहज समजेल असा विचार मांडण्यासाठी मराठीतूनच विचार करता आला पाहिजे. इंग्रजी भाषेतून विचार करणे व त्याचे मराठीत भाषांतर करणे ही क्रिया विषय समजण्याच्या आधीच होणे आवश्यक आहे. ज्या विषयावर भाषण द्यावयाचे आहे त्या विषयाचा अभ्यास करताना इंग्रजी भाषेचे माध्यम वापरणे आवश्यक होते. एकदा अर्थबोध झाल्यावर या भाषेची आवश्यकता नसते. समजलेला विचार हा 'स्व'चाच एक भाग बनतो. त्याचे रूपांतर आपण कोणत्याही भाषेत करू शकलो पाहिजे. विषयाची माहिती वाचून, त्या भाषेतून अर्थ समजावून घेऊन, त्या माहितीचे रूपांतर आपल्या ज्ञानात करण्याकरता नव्याने मिळालेली माहिती आणि आजवर मिळालेले ज्ञान याची सांगड घालणे आवश्यक असते. आजवर मिळालेले ज्ञान कोणत्याही भाषेच्या माध्यमातून मिळालेले असो, आता ते भाषेच्या रूपात साठवावयाचे नसते; 'ज्ञान' या स्वरूपात साठले गेले पाहिजे. अन्यथा 'माहितीला'च 'ज्ञान' समजण्याची गफलत होईल ! 'स्मरणशक्ती'लाच 'प्रज्ञा' समजण्याची चूक होईल ! एकापाठोपाठ एक अवतरणे उद्धृत करण्याने आपली स्मरणशक्ती वापरून फक्त आपले 'पांडित्य' प्रदर्शित होईल. ज्ञान सांगण्यास भाषेचा अडसर नाही, हे ज्ञानेश्वरांनी 'भावार्थदीपिका' सांगून सिद्ध केलेले आहेच. अध्यात्मासारखा गहन विषयदेखील सोप्या मराठीत सांगता येतो तर वैद्यकासारखा तुलनेने सामान्य प्रापंचिक विषय का सांगता येऊ नये ? विचार मराठीतूनच करावयाचा. एखादा मराठी शब्द आठवला नाही तर तो शोधावयाचा. एका शब्दात अर्थ व्यक्त होत नसला तर अधिक शब्द वापरावे लागले तरी चालतील. फार झाले तर इंग्रजी प्रतिशब्द घ्यावा, पण विचार मराठीतूनच मांडावा असे ठरविले.

आजपर्यंत काही शास्त्रीय प्रबंधांचा अपवाद वगळता बहुतेक सारे लिखाण मी मराठीतूनच केले आहे. श्रोतृवृन्दाने इंग्रजीतूनच विचार मांडावेत अशी सूचना केली तर ती भाषा वापरणे अपरिहार्य ठरले आहे, अथवा भाषणेसुद्धा मराठीतून केली आहेत. यासाठी तयारी करावीच लागते. मराठीतून मुद्दे काढावे लागतात. ते काढतांना आपल्याला तांत्रिक शब्द वापरावे लागणार आहेत किंवा कसे याची योजना करावी लागते. आपल्या श्रोत्यांचे या विषयातील ज्ञान किती असेल याचा अंदाज बांधावा लागतो. कधीकधी पुनरावृत्ती किंवा स्पष्टीकरण करावे लागते. ''विचार हा आपल्या प्रज्ञेवर जागृतावस्थेत आलेला स्थलकालबद्ध बोधपूर्ण तरंग आहे.'' ही व्याख्या पुन्हा सांगावी लागते. प्रज्ञा म्हणजे काय, प्रज्ञा, बुद्धी आणि माहिती यांच्यातील फरक सांगावा लागतो. आपल्या जाणिवेच्या जागृती, सुशुप्ती, स्वप्न आणि तूर्या या अवस्थांबद्दल स्पष्टीकरण द्यावे लागते. स्थल-काल-बद्ध म्हणजे व्यक्ती, प्रसंग अथवा स्थान यांच्या संबंधीचे हे विवेचन आहे असे सांगावे लागते व बोध होण्याकरिता वाक्य पूर्ण असावे लागते; कर्ता, कर्म, क्रियापद समजणे म्हणजे वाक्य समजणे हेही समजावून द्यावे लागते. बोध हाही एक आनंदाचाच अनुभव आहे; कारण बोध 'स्व'ला होतो. आणि 'स्व'चे स्वरूप सत्-चित्-आनंदस्वरूप आहे याची आठवण करून द्यावी लागते. सुदैवाने भारतीय आणि विशेषत: महाराष्ट्रीय मनाला अध्यात्म अपरिचित नाही. परंतु व्हावी इतकी शास्त्राची जाण नाही, असा माझा अनुभव मला सांगतो.

मराठी भाषेतील शब्द वापरावेत असे आग्रहाने सांगून माझी भाषा साफसूफ करण्यामध्ये कै. श्री. वि. श्री. मोडक यांचे नाव मी प्रथम घेईन. साध्या संभाषणापासून व्यासपीठावरील भाषणे करतांना इंग्रजी शब्दांचा कटाक्षाचा वापर टाळण्यासंबंधी त्यांनी माझे प्रबोधन केले नसते तर आज एक तास एखाद्या विषयावर बोलतांना शक्यतो एकही इंग्रजी शब्द येऊ द्यावयाचा नाही, असा निर्बंध मला पाळता आला नसता. आपल्या ज्ञानाचा उपयोग समाजाच्या प्रबोधनासाठी झाला पाहिजे हे श्री. मुकुंदराव किर्लोस्करांनी माझ्यावर वारंवार बिंबवले. 'घरोघरी ज्ञानेश्वर जन्मती' या पुस्तकाचे उगमस्थान किर्लोस्कर मासिकातील लेखमालेत आहे. आजवर माझी आरोग्यविषयक प्रसिद्ध झालेली सगळी पुस्तके लेख या स्वरूपात 'सकाळ'मध्ये आलेली आहेत. यातील भाषेच्या आणि मांडणीच्या अवतरलेल्या रूपामागे वि.श्री. मोडक, मुकुंदराव किर्लोस्कर, ह.मो. मराठे, राजीव साबडे, संतोष शेणई इत्यादी मंडळींचे हातभार लागलेले आहेत. समाजाचे सोप्या भाषेत प्रबोधन करण्याची पात्रता वरील सज्जनांच्या मदतीशिवाय आली नसती. त्या सर्वांचा मी ऋणी आहे. ■

'अंकुर', बी-775/76, एरंडवणे, डॉ. केतकर मार्ग, पुणे 411 001. दूरध्वनी 25654432

# हस्ताक्षराच्या गमतीजमती

कविता भालेराव

कुठलाही नवा शोध लागला की, त्याच्या फायद्यांपेक्षा तोटे कोणते हाच प्रश्न माणसाच्या मनात येतो. शिलाईयंत्राने शिवणकाम सुबक व भरभर होऊ लागलं तेव्हा हाताने शिलाई करणाऱ्या कारागिरांना काम मिळणार नाही, या शंकेने लोक बेचैन झाले. एवढंच काय परंतु २५-३० वर्षांपूर्वी संगणकाने सर्व क्षेत्रांत प्रवेश केला तेव्हा बेकारी वाढेल, ही भीती लोकांमध्ये निर्माण झाली. हीच गोष्ट टाईपरायटर आणि टेलिफोनच्या शोधामुळे झाली. या उपकरणांमुळे हाताने लिहिण्याची कला माणूस विसरेल की काय ? बॉलपॉइंटपेनने लिहिणं चांगलं की फाऊंटनपेनचं बरं ? अशा प्रकारचे प्रश्न लिहिण्याचा कलेसंदर्भात विचारले जात होते.

स्कॉटलंडमधल्या सुंदर हस्ताक्षर असणाऱ्या रेनिगाल्ड पिगट या तरुणाला वरील प्रश्नांनी अस्वस्थ केले. खरंच लोकांच्या मनात हस्ताक्षराबद्दल काय विचार आहेत ? की टाइपरायटरने कडकट्ट करत उमटणारे एकसारखे शब्द पाहून त्यांना हातांनी लिहावंसं वाटत नाही ? टेलिफोनवर बोलून भागत असेल तर पत्रं हातानं लिहायची कशाला, असं लोकांना वाटतंय का ? या प्रश्नांनी रेनिगाल्ड पिगट अस्वस्थ झाला. आपल्या प्रश्नांची उत्तरे मिळविण्यासाठी रेनिगाल्डने एक मोहीम आखली आणि १९५६मध्ये जागतिक हस्ताक्षरपाहणी-मोहिमेला प्रारंभ केला.

रेनिगाल्डने वर्तमानपत्रांतून, मासिकांमधून लोकांना हस्ताक्षराचा नमुना पाठवून देण्याचे आवाहन केले. रेनिगाल्डच्या या आगळ्यावेगळ्या आवाहनाला अभूतपूर्व प्रतिसाद मिळाला. सर्व थरांतल्या माणसांनी रेनिगाल्डला आपले हस्ताक्षर पोस्टाने पाठवले. आठवड्याभरात जवळजवळ २५,००० पत्रे रेनिगाल्डच्या नावाने आली. पोस्टाच्या कर्मचाऱ्यांमध्ये या पत्रांच्या कामाने खळबळ माजवून दिली. तर रेनिगाल्डच्या घरी पत्र पोहोचविणाऱ्या पोस्टमनची एवढ्या संख्येमुळे त्रेधा तिरपीट उडाली. रेनिगाल्डलाही हे सर्व अनपेक्षित होते. समाजात, रेनिगाल्डला नकळत एक वेगळे महत्त्व प्राप्त झाले. ही पत्रे म्हणजे अगदी गंमतजंमत होती. कित्येकांनी आपले लहानपणी हस्ताक्षर चांगले होते; पण आता खराब झाले किंवा बदलले आहे, अशी कबुली दिली

होती. कित्येक पालकांनी आणि शिक्षकांनी नव्या पिढीच्या हस्ताक्षराबद्दल चिंता व्यक्त केली होती. शाळाचालकांनी, शाळेत विद्यार्थ्यांचे हस्ताक्षर कसे सुधारले जाते, याबद्दल लिहिले होते. पोस्टातील पोस्टमास्तरांनीही, पत्ता लिहिलेले अक्षर, इतके वाईट असते की, ते वाचताही न आल्याने, अशी कितीतरी पत्रे पोस्टात साठून राहिल्याची तक्रार रेनिगाल्डला कळवली होती. एका माणसाने तर डॉक्टरांचे हस्ताक्षर न कळल्याने, सर्जनने करंगळीऐवजी मधल्या बोटाचे ऑपरेशन करून टाकले, हा स्वानुभव कळवला होता.

अर्थात या पत्रांमध्ये कितीतरी पत्रे चांगल्या हस्ताक्षरातही होती. हस्ताक्षर हे प्रत्येक व्यक्तिगणिक बदलत असल्याने, कुठलाच एक निष्कर्ष रेनिगाल्ड काढू शकत नव्हता. परंतु या अभूतपूर्व प्रतिसादावरून, लोकांच्या लिहिण्याच्या कलेवर, किंवा इच्छेवर कुठल्याही तांत्रिक प्रगतीचा परिणाम झाला नव्हता, हे मात्र निश्चित झाले होते.

गेली कित्येक शतके धार्मिक आणि कायदे संबंधातील लिखाण हे एका ठरावीक पद्धतीनेच लिहिले गेले आहे. पूर्वीच्या काळी भरभर लिहिण्याला फारसे प्राधान्य नव्हते. एका विशिष्ट पद्धतीने ते लिहिले जाण्यास जास्त महत्त्व दिले जाई. परंतु जसजसा शिक्षणाचा प्रसार झाला, नवनवीन व्यवसाय निर्माण झाले, तसतशी हस्ताक्षरातही विविधता आली, असे पिगटच्या लक्षात आले. त्याने व्यवसायानुरूप, सामाजिक दर्जानुसार हस्ताक्षराच्या नमुन्यांचे गट तयार केले. त्याने एकूण सव्वीस व्यवसायानुरूप गटांमधून हस्ताक्षराबद्दलचे निष्कर्ष काढले.

लहानपणी शाळेत पाटीवर अभ्यास करणाऱ्या मंडळींपैकी रेल्वेतील कामगार, लॉरी-बसचे ड्रायव्हर यांचा पुढच्या आयुष्यात कागदावर लिहिण्याशी फार संबंध येत नाही, हे त्यांच्या अक्षरावरून लक्षात येत होते. वकील, ऑफिसमधले कारकून यांचे अक्षर भरभर लिहिलेले, परंतु समजण्याजोगे होते. एकोणिसाव्या शतकातील विल्यम मॉरीसच्या 'आर्टस् ॲन्ड क्राफ्ट'च्या चळवळीतील इटॅलिक पद्धतीचे वळण कलाकारांच्या अक्षरात दिसत होते. तर संशोधक, शास्त्रज्ञ यांच्या लिखाणात जोडलेली किंवा अर्धवट जोडलेली अक्षरे, अशी सरमिसळ आढळली.

रेनिगाल्डच्या या मोहिमेआधी १०-१२ वर्षे, लिखाणासाठी बॉलपॉइन्टपेनचा वापर सुरू झाला होता; परंतु रेनिगाल्डकडे आलेल्या पत्रांपैकी ८५ टक्के पत्रे फाऊंटन पेनने लिहिलेली होती. हाताने काम करणारे कामगार, शेतकरी, मनोरंजन करणारे कलाकार यांनी बॉलपेनने लिहिले होते; तर विद्यार्थी, वकील, सैन्यातले अधिकारी, अशा अनेकांनी फाऊंटन पेन वापरले होते.

रेनिगाल्डने केलेल्या आवाहनाला उत्तर देण्यासाठी सर्वांनी मुद्दाम पत्र लिहिले होते. त्यामुळे आपले हस्ताक्षर अधिकाधिक चांगले यावे, असाच त्यांचा प्रयत्न होता.

तरीसुद्धा कलाकार, कंपनीचे संचालक, अभियंते, वैज्ञानिक यांचे हस्ताक्षर विशेष चांगले नव्हते. त्यामानाने शेतकरी, फिरते विक्रेते यांचे अक्षर मध्यम प्रतीचे, समजणारे होते. रेनिगाल्डच्या मते ४४ टक्के लोकांचे हस्ताक्षर चांगले, स्पष्ट, वाचायला सोपे होते.

सर्वात शेवटी रेनिगाल्डने सर्व पत्रांची वर्गवारी शाईच्या रंगावरून केली. तेव्हा त्याला खूप मजेशीर गोष्टी लक्षात आल्या. स्त्रियांनी निळ्या शाईने, तर पुरुषांनी निळ्याकाळ्या शाईने लिहिले होते. कलाकार, वास्तुविशारद, धर्मप्रसारक, माध्यमिक शाळेचे विद्यार्थी यांनी काळी शाई वापरली होती. मुद्रणाचे काम करणाऱ्या लोकांनी तपकिरी किंवा चॉकलेटी रंगाच्या शाईने लिहिले होते; तर बॅलेनर्तक आणि मनोरंजन करणाऱ्या कलाकारांना जांभळ्या रंगाच्या शाईचे आकर्षण असावे. शिक्षक आणि शास्त्रज्ञांनी लाल रंगाला प्राधान्य दिले होते, तर स्त्री लेखिका किंवा कादंबरीकारांनी हिरव्या शाईची निवड केली होती.

अशा तऱ्हेने विविध दृष्टिकोणातून, हस्ताक्षरांचे केलेले संशोधन रेनिगाल्डने १९५८मध्ये 'हॅन्डरायटींग : ए नॅशनल सर्व्हे' या शीर्षकाखाली प्रसिद्ध केले. त्यात त्याने, बदलत्या काळानुरूप हस्ताक्षरात बदल होत राहणार, असे नमूद केले. त्याचप्रमाणे लिखाणाची साधने - कागद, पेन, शाई यामध्ये नव्या तंत्रज्ञानाने झपाट्याने क्रांती होईल, असेही म्हटले आहे. त्यासाठी त्याने बॉलपॉइंट पेनचे उदाहरण दिले आहे. खरं तर १८८८मध्ये सर्वप्रथम बॉलपॉइंट पेनचे पेटंट घेतले गेले, परंतु हंगेरीच्या बिरो बंधूंनी १९४३मध्ये जेव्हा या पेनात, चटकन वाळणारी, तेलाचा अंश असलेली शाई भरली, तेव्हा या पेनाच्या उपयुक्ततेत आमूलाग्र बदल होऊन त्याचा झपाट्याने प्रसार झाला. सरतेशेवटी रेनिगाल्डने, ''आपणच आपले हस्ताक्षर हा राष्ट्रीय ठेवा म्हणून जतन केले पाहिजे आणि त्यासाठी अभिमानी राहिले पाहिजे,'' असे म्हटले आहे. ■

५, हरिहरेश्वर सोसायटी, ९७७, गोखलेनगर रस्ता, पुणे 411 016. दूरध्वनी 25674517

# ऊंझा-जोडणी

बळवंत पटेल

ऊंझा-जोडणी म्हणजे गुजराती भाषा परिषदेने (मूलतः भाषाशुद्धी अभियान) ऊंझा येथे भरविलेल्या अधिवेशनात घेतलेल्या निर्णयानुसार (ठरावाप्रमाणे) ऱ्हस्व-दीर्घ अशा दोन-दोन इ-ई, उ-ऊ ऐवजी फक्त एकच ई व उ चा वापर करावा, अर्थात् फक्त दीर्घ ई ( ी ) व ऱ्हस्व उ ( ु )चीच चिन्हे वापरली जावीत असा निर्णय घेण्यात आला. (उदा० वीद्या, शीक्षक, वीनंती, रुप, वधु, मधु, धुर इ०)

गुजराती भाषेच्या लेखनात विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकापर्यंत शुद्धलेखनाच्या बाबीत एकसूत्रता नव्हती. सर्वमान्य अशा निश्चित नियमांची व्यवस्थाच मुळी नव्हती. या संदर्भात नर्मद, नवलराम इत्यादी सुप्रसिद्ध साहित्यकारांच्या काळात काही ऊहापोहास सुरुवात झाली, परंतु एकवाक्यता निर्माण होऊ शकत नव्हती. महात्मा गांधींनी १९२९मध्ये शुद्धलेखनाचे नियम निश्चित करवून घेऊन गुजरात विद्यापीठाद्वारे एक 'जोडणीकोश' (शब्दकोश) प्रकाशित करविला. 'गुजराती सार्थ जोडणीकोश' या कोशास १९३९मध्ये गुजराती साहित्य परिषदेने मान्यता दिली. इ.स. १९४०मध्ये सरकारी मान्यताही मिळाली. गुजरात विद्यापीठाच्या या शब्दकोशास सर्वमान्यता मिळवून देण्याच्या कार्यात म. गांधींचा मोठा प्रभाव दिसून येतो.

वास्तविकरीत्या शुद्धलेखनाचे नियम घडविण्याने भाषकास शुद्ध शब्दलेखनाची किल्ली मिळावयास हवी. शुद्ध म्हणजेच मान्यताप्राप्त, चूक केल्याशिवाय लिहिण्याची क्षमता लेखकात निर्माण व्हावयास हवी. परंतु तसे काही घडू शकले नाही. त्याचे मुख्य कारण नियमांची जटिलता, गुंतागुंत हे होय. विशेषतः ई-ऊ संबंधात घडलेले नियम (नियमांमधील विसंगती किंवा नियमांचीच अनियमितता). या संदर्भात काही विद्वानांचे अभिप्राय विचारात घेण्यायोग्य आहेत. तें असे :

तद्भव शब्दांमध्ये ऱ्हस्व दीर्घ ई-उ संबंधित नियम पहा. लगेच लक्षात येईल की हे तंत्र नव्हे; पण अतंत्रच म्हणावे लागेल. ई-उ युक्त शब्दांची अक्षरसंख्या, त्यात 'ई-उ'चे स्थान, जोडाक्षरांचे सान्निध्य, अनुस्वार, निरनुस्वार शब्दांची स्थिती, अनुस्वाराची मंदता-तीव्रता (उच्चारित-अनुच्चारित, स्वल्पउच्चारित, पूर्णउच्चारित), शब्दांचे मूळ

रूप, नामिक रूप, आख्यातिक रूप - या सर्वांमध्ये 'ई-उ'चा अगदी गोंधळच माजलेला दिसतो. त्या व्यक्तिरिक्त व्युत्पत्ती, प्रचलितता व स्वरभाराप्रमाणे लेखनाचे धोरणही पाळावे लागते, ते वेगळेच.

गुजराती शब्दकोशात 'ई-उ' युक्त शब्दलेखनासाठी आठ नियम दिलेले आहेत व त्यांस सात अपवाद देण्यात आले आहेत. त्यासाठी सात स्पष्टीकरण-नोंदी आहेत. हे सर्व विशेषत: 'ई-उ' साठीच. परंतु ही स्पष्टीकरणे मुळीच तर्कसंगत नसून चालू न शकणारी आहेत. साक्षात् बृहस्पती पण त्यांचा बिनचूक वापर करू शकणार नाही.

समग्रपणे पाहता स्थिती अशी दिसते की, नियम आपल्याला अमुक एक सीमेपर्यंत घेऊन जाऊ शकतात. शेवटी तर शब्दकोशालाच शरण जावे लागते. त्यावरही कडी करणारी स्थिती अशी की शब्दकोश (मान्य) स्वत:च ठरविलेल्या नियमांचे पालन करू शकलेला नाही असे आढळते.

श्री. भृगुराय अंजारिया यांनी म्हटले आहे की, 'शुद्धलेखन करण्यासाठी शिकू इच्छिणाऱ्यांना किंवा शिकवू इच्छिणाऱ्या शिक्षकांना सुद्धा हा शब्दकोश कानाचे मार्गदर्शन, तर्काचे मार्गदर्शन किंवा स्वत: कोशाने ठरविलेल्या नियमांचे मार्गदर्शन करण्यात तोकडा पडतो, मार्गदर्शनासाठी वावच राहूच देत नाही.' हे नियम अपूर्ण असून विसंवादी आहेत.

शुद्धलेखनाची जटिलता मुख्यत्वे ऱ्हस्व-दीर्घ इ-ई व उ-ऊच्या संदर्भातच विशेष रूपाने जाणवते. भाषाविद व विद्वत्वर्यांच्या मते अर्वाचीन गुजराती उच्चारांमध्ये ई-उ वगैरे स्वरांची ऱ्हस्वता-दीर्घता यांमध्ये भेदच उरलेला नाही. भाषकास त्याचे भेदभानच राहिलेले दिसत नाही. शब्दांच्या अर्थबोधासाठी स्वरांची मात्रा कुठल्याही प्रकारे साधक ठरू शकत नाही. म्हणूनच आमचे म्हणणे असे आहे की, ऱ्हस्वता-दीर्घता सुचविणारी दोन-दोन लिपिचिन्हे ठेवण्याची आवश्यकताच नाही. पंडित बेचरदास दोशी, प्रबोध पंडित, के.के. शास्त्री, डॉ. दयाशंकर जोशी, डॉ. योगेन्द्र व्यास, पुरुषोत्तम मिस्त्री, कै. जयन्त कोठारी आणि इतर अनेक भाषाशास्त्रज्ञ सुद्धा एकच ई-उ असावेत या विचाराचे समर्थन करतात. के. के. शास्त्रींच्या नेतृत्वाखाली भरविलेल्या गुजराती साहित्य परिषदेत 'जोडणी सुधारणा समिती'ची स्थापना झाली होती. त्या समितीने १९८७मध्ये एकच ई-उ ठेवण्याचे सुचविले होते. परंतु हा निर्णय काही अगम्य कारणांस्तव उंच खुंटीवर सुरक्षित ठेवण्यात आला.

जे शिक्षक-प्राध्यापक अनेक वर्षांपासून गुजराती भाषा शिकवीत आहेत त्यांना प्रचीती आली आहे की संपूर्ण निष्ठेने गुजरात विद्यापीठाच्या कोशाने मान्य केलेले नियम कसोशीने पाळूनसुद्धा विद्यार्थ्यांवर त्याचा अपेक्षित प्रभाव-संस्कार झालेला दिसत नाही.

नियमांची जटिलता लक्षात घेता अपेक्षित प्रभाव होईलच असा संभवही वाटत नाही. त्यांना सतत वाटते की, निश्चित केलेल्या नियमांचा पुनर्विचार करून त्यांत सुधारणा केलीच पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाही. या संदर्भात विद्यापीठास अनेकानेक विनंत्या करून झाल्या; परंतु त्या सर्व बधिर कानांवर आदळून अदृश्य झाल्या. पालथ्या घागरीवर पाणी ओतल्यास सर्व व्यर्थ.

अशी विनंती करण्यात वडनगर (उत्तर गुजरात)चे प्राध्यापक रामजीभाई पटेल (सध्या अहमदाबाद) यांनी पुढाकार घेतला होता. अगदी तपस्वी मनुष्याप्रमाणे या कार्यास वाहून घेऊन, या कामास जीवनध्येय बनवून त्यांनी आजतागायत त्यांचे प्रयत्न चालू ठेवले आहेत. परंतु विद्यापीठाने अशी जिद्द व जडता दाखवून संपूर्णपणे कानाडोळा केला व स्पष्ट सांगितले की, 'कोशाच्या नियमांमध्ये कुठलाही बदल करता येणार नाही.' कारण या नियमांवर गांधीजींनी शिक्कामोर्तब केलेले आहे. (शब्दकोशाच्या प्रथम पानावर गांधीजींचे कथन असे नमूद केलेले आहे, 'आता यापुढे कोणासही मनस्वीपणे जोडणी करण्याचा अधिकार नाही.')

वास्तविकता अशी आहे की, गुजराती साहित्य परिषदेने विद्यापीठाच्या शब्दकोशास मान्यता दिली त्या वेळी गांधींजींनी स्वत: के.के शास्त्री यांना सांगितले होते की, 'ह्या कोशामुळे (माझ्या कथनामुळे) जोडणी सुधारणेचा मार्ग बंद होत नाही.' विशेषत: हा कोश तयार करणाऱ्यांत प्रमुख असलेल्या काकासाहेब कालेलकरांनी पण कोशाच्या प्रथम आवृत्तीच्या प्रस्तावनेत स्पष्टपणे नमूद केलेले आहे की, 'एकदाची अव्यवस्था दूर होऊन व्यवस्था स्थापन झाली की मग सुधारणेचे कार्य अधिक सुरळीत व सुगमपणे होऊ शकेल.' परंतु हा 'परंतु' सर्वत्र नडतो. विद्यापीठाच्या कोशकार्यालयाने वरील सर्व विचार फेटाळून लावून नियम-सुधारणा-पुनर्विचारासाठी आपली सर्व दारे घट्ट लावून घेतली आहेत. (औरंगजेबाचे संगीताच्या वाद्यांचे दफन धन सहज आठवते.)

विद्यापीठ किंवा साहित्य-निर्मिती-संस्था याबाबतीत मौन धारण करून आहेत, काही करण्यास तयार नाहीत, ह्या सत्याची खात्री झाल्यानंतर श्री. रामजीभाईंनी जोडणी सुधारणा-परिषद भरविण्यासाठी आंदोलनाचा शंखनाद केला. या कार्यात सुरतेत स्थायी झालेले श्री. उत्तमभाई गज्जर यांनी पांचजन्याच्या पाचारणास देवदत्त शंखाचा जोरदार प्रतिसाद दिला. पाचारण झाले आणि एका पाठीमागे एक याप्रमाणे डॉ. जयन्त कोठारी, दयाशंकर जोशी यांच्यासारख्या मोठ्या दर्जाच्या भाषाविदांनीही आपापले शंख फुंकून उत्तम पाठिंबा दिला. ('शङ्खान् दध्मुः पृथक् पृथक्'प्रमाणे) काही उत्तम शिक्षकही यात सामील झाले. या सर्वांच्या जोरदार प्रतिसादाचा सरळ भावनात्मक परिणाम म्हणून जानेवारी १९९९मध्ये ऊंझा गावी ही परिषद भरविली गेली. ऊंझा

येथील अनेक संस्थांनी यात आर्थिक सहकार्य केले; एवढेच नव्हे, तर परिषदेची उत्तम व्यवस्थाही स्वशिरी घेतली.

या परिषदेत २५०च्या वर विद्वान, भाषाविद्, शिक्षक, संपादक, साहित्यकार उपस्थित होते. या सर्वांमध्ये एक प्रखर अभ्यासू, मूलत: उत्तम मेडिकल डॉक्टर व भाषाविषयक नितांत प्रेम व अध्ययन असलेले डॉ. निशीथ ध्रुव व लंडनस्थित विपुल कल्याणीसारखे वर्तमानपत्राचे संपादक, तसेच साहित्य-सर्जनात कर्मरत असे अनिवासी भारतीय पण सक्रियपणे सहभागी झाले होते. दोन दिवसांच्या या सघन विचार-चर्चा-चिंतनाच्या अखेरीस परिषदेने सर्वानुमते पुढील ठराव केला :

**अखिल गुजरात जोडणी परिषदेचा ठराव**

गुजराती भाषेचे प्रचलित ई-उ संबंधित नियम अतार्किक व परस्पर विसंगत आहेत. गुजराती भाषेत 'ई-उ'चे ऱ्हस्वत्व-दीर्घत्व अर्थभेदक-अर्थबाधक नाही व वास्तविकही नाही. म्हणून आता ह्यानंतर हे नियम रद्द करावेत आणि लेखनात सर्वत्र एकच ई व उ ची योजना व्हावी. ई साठी फक्त दीर्घ ई व चिन्ह ( ी ) आणि उ साठी फक्त एकच ऱ्हस्व उ व चिन्ह ( ु ) वापरावे. (ऊंझा ता. ९/१० जानेवारी १९९९)

ऊंझा परिषदेच्या ह्या निर्णयानुसार गुजराती लेखनात दीर्घ ई व ऱ्हस्व उ युक्त शब्द राहतील. या ठरावास 'ऊंझा जोडणी' म्हणून आता ओळखले जाते.

विशेष लक्षात घेण्याची गोष्ट ही की जोडणीमध्ये एकच 'ई-उ'चा हा विचार तसा नवीन नाही. 'सरस्वतीचन्द्र' (भाग १ ते ४)चे लेखक व कर्मधर्मसंयोगाने गुजराती साहित्य परिषदेचे प्रथम अध्यक्ष कै. गोवर्धनराम त्रिपाठींनी पण त्यांच्या काळात हा विचार मांडला होता. त्यापूर्वीही भारतीय भाषासाहित्याचे सघन अध्ययन करणाऱ्या दोन परदेशी भाषाविदांनीही नमूद केलेले आहे की, 'गुजराती भाषेत ऱ्हस्व-दीर्घ स्वरभेद प्रत्यक्षात दिसत नाही.' हे प्रसिद्ध विद्वान म्हणजे आर्.आर्.टर्नर व लुडविग आल्स्डॉर्फ हे होत. या परदेशी विद्वानांची गोष्ट सोडून दिली तरी फक्त 'सरस्वतीचन्द्र'चे लेखक महाविद्वान गोवर्धनराम त्रिपाठी यांच्यासारखे धुरंधर 'ऊंझा जोडणी'च्या विचारास समर्थन देत होते, एवढी एकच गोष्ट पुरेशी आहे.

नोंद : परिषदेने वरील एकच सुधारणा तूर्त केलेली आहे. इतर कुठलाही फरक केलेला नाही. गुजराती लेखनात वरील एक फरक सोडता गुजरात विद्यापीठाच्या 'सार्थ जोडणीकोश'मध्ये दिलेले इतर सर्वच्या सर्व नियम यथावत राहू दिले आहेत. वरील ठराव झाला त्याच दिवसापासून आणंद येथे प्रकाशित होणारे 'मध्यान्तर' दैनिक व जवळजवळ अन्य वीस नियतकालिकांचे मुद्रण वरील ठरावानुसार होऊ लागले. अंदाजे पन्नास लेखकांची साठाहून अधिक पुस्तके अशा 'ई-उ'च्या फरकाप्रमाणे प्रकाशित

झालेली आहेत, अजूनही होत आहेत. गुजराती भाषेतील वरिष्ठ प्रकाशन संस्था 'इमेज पब्लिकेशन्स' व सुरतेची 'साहित्य संकुल' वगैरे कित्येक प्रकाशन संस्था पण ऊंझा जोडणीच्या धोरणानुसार प्रकाशने करीत आहेत.

**'ऊंझा जोडणी परिषद' : एक दस्तावेज**

वरील नावाचा २०० पृष्ठसंख्या व रु. १२५/- किंमत असलेला एक ऐतिहासिक ग्रंथ 'गुजराती भाषा परिषदे'तर्फे नुकताच प्रकाशित झाला आहे. ९/१० जानेवारी, १९९९मध्ये ऊंझा येथे झालेल्या जोडणी परिषदेच्या ऑडियोरेकॉर्डिंगवरून तो ग्रंथस्थ झालेला आहे. भाषाप्रेमी श्री. रतिलाल चंद्रय्या यांची प्रेरणा व आर्थिक साहाय्य यांमुळे सहा वर्षांनंतर याचे प्रकाशन होऊ शकले आहे. परिषदेच्या सर्व बैठकांमध्ये उपस्थित सर्व वक्त्यांची वक्तव्ये, अभिप्राय, चर्चा, प्रश्नोत्तरे, प्रत्येक बैठकीच्या अध्यक्षांची वक्तव्ये व विद्वत्तापूर्ण भाषणे, सहभागी विद्वानांची नामावली इत्यादी सर्व बारीकसारीक बाबींची लिखित नोंद यात आहे.

(ग्रंथप्राप्तीसाठी लिहा : श्री. इन्द्रकुमार जानी, सचिव : गुजराती भाषा परिषद, खेत भवन आश्रमाजवळ, अहमदाबाद 380 027 (भारत) )

■

प्लॉट 667, सेक्टर - 21, 'पंचशील', गांधीनगर 382 021, भारत

**लेखकांसाठी सूचना : २**

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे. ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतरही द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए.आर.' नको; 'अ.रा.' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी. लिखाणासोबत स्वतंत्र कागदावर स्वत:चा परिचय (शिक्षण, व्यवसाय, प्रकाशित लेखन इ०) थोडक्यात द्यावा. दूरध्वनी क्रमांक (संकेतक्रमांकासह) द्यावा.

**दखलयोग्य**

# राज्यात घडताहेत अर्धवट ज्ञान असलेले 'शिक्षक'

--

राज्यातील डी.एड., बी.एड. संस्थांमध्ये चक्क अर्धवट ज्ञान असलेले भावी शिक्षक घडत आहेत. बारावीत ७५ ते ८८ टक्के गुण मिळविलेल्या या भावी शिक्षकांना 'शिस्तप्रिय', 'क्षमताधिष्ठित', 'कर्तव्यनिष्ठ' हे शब्द व्यवस्थित लिहिता येत नाहीत. इंग्रजी विषयाची शिक्षिका होण्याचे स्वप्न पाहणाऱ्या एका विद्यार्थिनीला 'सायन्स' या शब्दाचे स्पेलिंग लिहिता येत नाही.

नांदेड येथील 'प्रज्ञा प्रतिष्ठान' या संस्थेने नांदेड जिल्ह्यातील डी.एड., बी.एड. संस्थांमधून एक हजार विद्यार्थ्यांची प्रातिनिधिक पाहणी केली. प्रतिष्ठानने एक हजार विद्यार्थ्यांकडून २३ प्रश्नांची एक प्रश्नावली लिहून घेतली.

एका विद्यार्थ्याने लता मंगेशकर हा शब्द 'लत्ता' असा लिहिला आहे. शिक्षक का व्हावेसे वाटते, या प्रश्नावर 'आतापर्यन्त कोन्हीच मनले नाही. मी म्हणाने हा वेवसाय निवडला. शिक्षकी पेशा पवीत्र असतो.' असे चक्रावणारे उत्तर मिळाले.

एका विद्यार्थ्याने लिहिले आहे, कमी मेहनतीत जास्त पगार मिळतो आणि शिक्षकाचे काम करता करता शेतीकडेही लक्ष देता येते, असेही काही भावी शिक्षकांनी लिहिले आहे. 'पूर्वी मुलांची टिवीशन घेतच होते म्हणून शिक्षक व्हायचे ठरवले,' असे एका विद्यार्थिनीने लिहिले आहे.

अनेक शिक्षकांनी आपल्याला शिक्षक होऊ नको, असे सांगितले असतानाही केवळ पालकांच्या इच्छेखातर शिक्षकी पेशा पत्करणार असल्याचेही बहुतेक विद्यार्थ्यांनी म्हटले आहे. बारावीत ८८ टक्के गुण असलेल्या एका विद्यार्थिनीने 'एमपीएससी'ची परीक्षा देऊन 'आयएएस' अधिकारी होणार असल्याचे लिहिले आहे. 'शिक्षक म्हणजे भरवशाची नोकरी.' असे अनेकांनी लिहिले आहे.

■

'दै. सकाळ', ५.९.०७

# भाषाशिक्षकांसाठी कार्यशाळा - एक अनुभव

नीलिमा गुंडी

इयत्ता बारावीच्या नव्या अभ्यासक्रमासाठी 'मराठी' विषयाच्या शिक्षकांकरिता कार्यशाळेचे संयोजन करताना आलेला अनुभव आजच्या भाषाशिक्षणाबाबतच्या परिस्थितीच्या संदर्भात लक्षात घेण्याजोगा आहे.

कार्यशाळेतील तीन दिवसांच्या कार्यक्रमामध्ये 'ग्रंथालयाच्या सहवासात' असे एक सत्र होते. ग्रंथालयात पुस्तके शोधण्यासाठी निमित्त म्हणून काही प्रश्न विचारले होते. त्यांपैकी 'पुरुषराज अळूरपांडे' हे कोणाचे टोपणनाव आहे ? - हा प्रश्न शेवटपर्यंत अनुत्तरितच राहिला !

आणखी एक प्रश्न म्हणजे एक काव्यमय उखाणा होता. आदल्या दिवशी डॉ. द.भि. कुलकर्णी यांनी तो उखाणा आपल्या 'कवितेचे अध्यापन' या विषयावर बोलताना सांगितला होता. त्याचे उत्तर 'अपार्थिवाचे चांदणे' या आपल्या पुस्तकातील एका लेखात असल्याचेही त्यांनी सांगितले होते. ग्रंथालयात 'अपार्थिवाचे चांदणे' हे पुस्तक शिक्षकांना उपलब्ध करून दिले. गंमत म्हणजे त्यातील 'समीक्षकाची आई' या लेखातील उखाण्याबाबतचा मजकूर दोनदा वाचून दाखवला. तेव्हा 'कुठे आहे यात उत्तर ?, द.भि. यांना फोन करायला पाहिजे !' अशी प्रतिक्रिया आली. पंधरापैकी फक्त एक शिक्षिका त्यातले उत्तर समजू शकली. तो मजकूर असा :

''मी विचारावे, ''करतळीं जी जन्मली ! सूर्यकरीं जी वाढली । पतिविण सती गेली । ऐसी नारी कोण ती ॥ ?'' तिने (लेखकाच्या आईने) क्षणभर आपल्या लुकलुकत्या नजरेने माझ्याकडे पाहावे. लटकेच म्हणावे, ''बाबा, खूप कठीण उखाना घातलास गड्या तू. मी खेड्यातली पोर. मला गवऱ्या थापण्याशिवाय दुसरं काय येतं रे?'' ('अपार्थिवाचे चांदणे', पृ. ३६)

यात औपचारिक शिक्षण न घेतलेल्या लेखकाच्या आईने खुबीने पेरलेले उत्तर आमच्या उच्चशिक्षित शिक्षकांच्या डोक्यावरून गेले ! भाषेतील व्यंजना जाणण्यात शिक्षकच जर इतके कमी पडत असतील, तर कवितेची दहीहंडी हळूहळू जमिनीवरच

आणून ठेवली जाणार, यात शंका नाही. माहितीच्या युगात ग्रंथालयाचा उपयोग अनेक प्रकारे शिक्षणाशी जोडून घ्यायला हवा. त्यात माहितीपेक्षा ज्ञानार्जनासाठी आवश्यक ती कुतूहलप्रेरित वृत्ती घडविण्याची गरज आहे. नाही तर 'पाठ्यपुस्तक सोपे हवे', अशा सरधोपट मागण्यांखेरीज दुसरे काहीच ऐकू येणार नाही !

कसे बदलायचे हे वास्तव ? शिक्षकांसाठी खास निवडक पाठ्यपुस्तकं तयार करून ? की आणखी काही कार्यशाळा घेत राहून ?---

■

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र. ५, पुणे 411 002,

**भाषा आणि जीवन**

वर्ष २५ अंक ३ (पावसाळा २००७) : मुद्रणदोषांची दुरुस्ती

| पृष्ठ | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|
| अनु. | ९ | परीघाचा | परिघाचा |
| अनु. | १४ | पारितोषक | पारितोषिक |
| अनु. | १५ | दीडदा | दिडदा |
| २ | ३ | सूचनाफलक | सूचना |
| २ | (खालून)९ | वाकयाचा | (शब्द वगळणे) |
| ३ | (खालून)३ | शब्दाचा अर्थाशी | शब्दाचा अर्थाशी संवाद |
| ३ | (खालून)४ | काळातीळ | काळातील |
| १७ | (खालून)९ | कळली | कळवली |
| ४९ | ८ | तेलगू | तेलुगू |
| ५१ | (खालून)९ | मंत्रालयाचा | यंत्रालयाचा |
| ५३ | शीर्षक | पारितोषक | पारितोषिक |
| ५४ | ९ | पारितोषक | पारितोषिक |
| ५५ | शीर्षक | दीडदा | दिडदा |
| ५७ | २ | विज्ञानाची | विज्ञानांची |
| ६३ | शेवटची | राजसूयज्ञ | राजसूय यज्ञ |

याच अंकातील दिवाकर मोहनींच्या लेखाचे शुद्धलेखन मूळ संहितेप्रमाणे ठेवलेले आहे.

# भाषाविज्ञानाचे स्वाध्यायपुस्तक

श्रीधर बा. गोखले

[परीक्षित पुस्तक : 'भाषा आणि भाषाविज्ञान', लेखक डॉ. रमेश धोंगडे, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि., पुणे. पृष्ठे २२४, किंमत रु. २५०/-]

डॉ. रमेश धोंगडेलिखित 'भाषा आणि भाषाविज्ञान' या पुस्तकाचा हेतू विद्यार्थी, शिक्षक, अभ्यासक आणि सर्वसामान्य वाचक यांच्यात भाषाविज्ञानाविषयी रुची निर्माण करणे आणि त्यांना विषयाचे मूलभूत आकलन करून देणे असा आहे. हे स्वाध्यायपुस्तक असल्याने पुस्तकाची रचना इतर पुस्तकांपेक्षा साहजिकच वेगळी आहे. प्रत्येक घटकात आठ उपघटक आहेत - पाठ्यमुद्दे, उद्दिष्टे, विषयविवेचन, सारांश पारिभाषिक शब्द, अधिक वाचनासाठी, प्रश्न आणि त्यांची उत्तरे शोधण्याचे उपघटक आणि उपक्रम. उपक्रम या शेवटच्या उपघटकात वाचकाला भाषाविज्ञानाचे दैनंदिन जीवनात उपयोजन करण्यास प्रवृत्त केले आहे आणि तसे केल्यास वाचक विचारप्रवण होऊन त्याला विषयाचे सम्यक् आकलन होणे शक्य आहे. तसेच त्यामुळे विषयाची रंजकता वाढण्यासही मदत होते. पुस्तकाच्या या विशिष्ट रचनेमुळे पुस्तकात मोठ्या प्रमाणात पुनरुक्ती होते; परंतु धोंगडे यांच्या शिक्षकी भूमिकेचा तो अटळ भाग आहे.

या पुस्तकाचे वैशिष्ट्य असे, की भाषाविज्ञानातील काही अत्याधुनिक संकल्पनांची ओळख (उदा० - किमानता, पर्याय यंत्रणा, आदिरूप) या पुस्तकात सुगम रीतीने करून देण्यात आली आहे. यावर मराठीत फारसे लेखन उपलब्ध नाही.

या पुस्तकातील सुरुवातीचे काही घटक भाषेच्या वेगवेगळ्या अंगांची आपल्याला ओळख करून देतात. उदा० भाषिक चिन्हव्यवस्था, भाषा आणि संप्रेषण, भाषाग्रहण आणि भाषासंपादन. त्यानंतर आपण भाषेच्या सर्वात लहान घटकापासून - ध्वनींपासून - सुरुवात करून क्रमाक्रमाने मोठ्या घटकांविषयी - रूपिम, पदबंध, वाक्य आणि शेवटी अर्थ - अधिकाधिक माहिती मिळवतो. या व्यवस्थेवर संरचनावादातील (स्ट्रक्चरलिझम) भाषिक शोधप्रणाली (डिस्कव्हरी प्रोसीजर)चा पगडा जाणवतो.

धोंगडे यांचा भाषाविज्ञान शिकवण्याचा प्रदीर्घ अनुभव आणि विषय सोपा करून मांडण्याची त्यांची हातोटी यांचा प्रत्यय आपल्याला या पुस्तकात येतो. त्यांनी आपल्या



अनुक्रमणिका








विवेचनात अनौपचारिक भाषाशैली वापरल्याने ते आपल्याशी बोलत आहेत असा भास होतो. हे पुस्तक इतर पुस्तकांपेक्षा याही बाबतीत वेगळे आहे. मात्र यात एक धोका आहे, की परीक्षेतसुद्धा विद्यार्थी कदाचित अशीच भाषाशैली वापरतील आणि परीक्षेत औपचारिक भाषाशैलीचाच वापर करणे आवश्यक असते हे विसरतील.

या पुस्तकाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे धोंगडे यांनी विषयविवेचनासाठी आणि स्पष्टीकरणासाठी मराठीतल्या अनेक उदाहरणांबरोबरच हिंदी व इंग्रजी भाषांमधील उदाहरणे दिली आहेत. घटकांवर आधारित प्रश्न आणि उपक्रम यांमध्येही मराठी, हिंदी आणि इंग्रजी या तीनही भाषांवरील प्रश्नांचा समावेश आहे. भाषाविज्ञान समजण्यासाठी आपल्याला येत असलेल्या सर्वच भाषांविषयी विचार करण्यास यामुळे वाचक प्रवृत्त होऊ शकेल.

सुरुवातीच्या नऊ घटकांमध्ये भाषेच्या मूलभूत अंगांविषयीचे विवेचन केले आहे. वाक्यरचनेच्या मर्यादित नियमांचा वापर करून अमर्यादित वाक्यनिर्मिती, मनोधिष्ठित, भाषिक चिन्हे, वर्तनवाद व मनोवाद यांतील फरक, भाषाग्रहणातील विविध अवस्था इत्यादी मुद्यांचा साकल्याने विचार या भागात केला आहे.

दहा ते पंधरा या घटकांमध्ये ध्वनिव्यवस्था व ध्वनिबदल यांविषयी विचार केला आहे. खंडकीय घटकांचा विचार करताना धोंगडे यांनी स्वर आणि व्यंजने यांचे वेगवेगळ्या दृष्टींनी वर्गीकरण केले आहे. तसेच आघात आणि सुरयोजन या पराखंडकीय घटकांचेही विश्लेषण केले आहे. ध्वनिबदलांशी संबंधित समानीकरण, असमानीकरण, विलोपन आणि तालव्यीकरण यांचा परामर्शही धोंगडे यांनी घेतला आहे.

ध्वनिशास्त्रासारख्या शास्त्रात अचूकपणा अतिशय महत्त्वाचा असल्याने लेखकाने खूप अधिक काळजी घेणे आवश्यक होते असे हे घटक वाचताना तीव्रतेने जाणवते. ध्वनिशास्त्रात ध्वनिचिन्हांचे महत्त्व असाधारण असल्याने ती अचूकपणे वापरणे आवश्यक होते. उदाहरणार्थ, [ ʃ ] या ध्वनिचिन्हांचा निम्मा भाग रेघेच्या खाली येणे आवश्यक आहे; परंतु पुस्तकात ते चिन्ह कायमच रेघेच्या वर छापले आहे. Bow (पृ. ७९), go(पृ. ८०) आणि pleasure (पृ. ८३) या शब्दांचे उच्चार चुकीचे दिले आहेत. पृ. ७५ व ७६ वर दिलेल्या इंग्रजी आणि मराठी शब्दांच्या स्वरतालिका वाचकाला समजण्यास अतिशय कठीण आहेत. तेथे अधिक विवेचन आवश्यक होते असे वाटते.

पृ. ७९वर असा उल्लेख आहे की sit-seat या शब्दांमध्ये जिभेच्या आकारात थोडा फरक पडतो; पण त्याचबरोबर ओठांच्या आकारातही थोडा फरक पडतो, याचा उल्लेख नाही. पृ. ९४वर असे म्हटले आहे, की [ क् ] हा ध्वनी [ ग् ]पेक्षा [ सघोषता] मध्ये वेगळा, [ ख् ]पेक्षा [महाप्राणस्फुटता] व [ सघोषता ] या दोहोंमध्ये वेगळा

असतो; परंतु [ क् ] आणि [ ख् ] हे दोन्ही ध्वनी अघोषच असल्याने वरील विधान चुकीचे आहे. घर्षस्फुट ध्वनींच्या उच्चारणात आधी घर्षण व नंतर स्फोट होतो असे प्रतिपादन पृ. ६३वर केले आहे. हे योग्य वाटत नाही. कारण स्फोट होण्यासाठी वायुप्रवाह एकदम सोडला जाणे हे आवश्यक आहे. पृ. ६८वर असा उल्लेख आहे की मराठीत [ म्ह् ] आणि [ व्ह् ] हे ध्वनी आहेत. हे प्रतिपादन अनाकलनीय आणि अस्वीकार्य आहे. [ म्ह् ] हा [ म् ] आणि [ ह् ] यांचा, तर [ व्ह् ] हा [ व् ] आणि [ ह् ] यांचा व्यंजनसमुच्चय आहे. 'स्वनिम'सारखी महत्त्वाची संज्ञा अनेक वेळा 'स्वानिम' अशी लिहिलेली आहे. वर निर्देश केलेल्या चुका व काही अस्वीकार्य मुद्दे यामुळे या पुस्तकाकडून ध्वनिशास्त्राच्या बाबतीत काही प्रमाणात निराशा होते.

घटक सोळा व सतरामध्ये शब्द आणि विकारप्रत्यय यांचा विचार करण्यात आला आहे. घटक सोळामध्ये पृ. १०९वर शब्दांच्या सहा जाती दिल्या आहेत- नाम, क्रियापद, विशेषण, क्रियाविशेषण, उत्तरयोगी व अव्यय. परंतु पृ. ११९वर सात शब्दजातींचा उल्लेख आहे - नाम, क्रियापद, विशेषण, क्रियाविशेषण, सर्वनाम, उभयान्वयी अव्यय आणि केवलप्रयोगी अव्यय. येथे केवळ संख्येचाच फरक नाही, तर पारिभाषिक संज्ञासुद्धा वेगवेगळ्या वापरल्या आहेत. त्यामुळे अभ्यासकांचा गोंधळ होण्याची शक्यता आहे. धोंगडे यांनी असे प्रतिपादन केले आहे, की समास निर्माण करण्याची प्रक्रिया मराठी नाही (पृ. १११), परंतु पृ. ११३वर त्यांनी लिहिले आहे, 'मराठीत समास करण्याची शब्दसाधना संस्कृतइतकी ताकदवान नसली तरी काही प्रमाणात आहे.' जर ही प्रक्रिया काही प्रमाणात का होईना, मराठीत असली, तर तिचे मराठीच्या दृष्टीने वस्तुनिष्ठ विश्लेषण होणे आवश्यक आहे. दुसरे असे, की संस्कृत शब्द मराठीचा भाग असल्याने ते मराठी शब्द मानून त्यांच्या समासप्रक्रियेचा विचार करणे आवश्यक आहे.

घटक अठरामध्ये रूपिम व्यवस्थेचा विचार केलेला आहे. रूपिका, रूपिकांतर व रूपिम या कल्पना ध्वनिव्यवस्थेतील स्वनिका, स्वनिकांतर व स्वनिम या कल्पनांशी समांतर आहेत. या घटकात मराठी व इंग्रजी भाषांची तुलना करून धोंगडे यांनी असे दाखवून दिले आहे, की मराठी शब्दांमध्ये अशी अनेक रूपिमे आहेत की ज्यांचा वापर सुटे शब्द म्हणून होत नाही.

घटक एकोणीस ते एकवीस यांत पदबंध आणि वाक्य यांच्या व्यवस्थेचा विचार केला आहे. मानवी भाषांमधील वैविध्य हे वरवरचे आहे आणि सर्व भाषांना लागू पडणारी सार्वत्रिक तत्त्वे आहेत हे धोंगडे समर्थपणे पटवून देतात. भाषेतील संदिग्धतेचे विवेचनही त्यांनी सोदाहरण केले आहे. शाखाकृती वापरून ते पदबंधरचना व वाक्यरचना

स्पष्ट करून सांगतात.

घटक बावीस व तेवीसमध्ये धोंगडे यांनी अर्थव्यवस्थेवर प्रकाश टाकला आहे. शब्दांच्या अर्थसंबंधातील वेगवेगळ्या शक्यता त्यांनी सोदाहरण स्पष्ट केल्या आहेत. वाक्य आणि उक्ती यांत मूलभूत फरक आहे. वाक्यार्थ हा भाषाविज्ञानाचा भाग, तर उक्ती हा भाषाउपयोजनशास्त्राचा भाग. भाषाउपयोजनशास्त्रावर आतापर्यंत मराठीत फारसे लिहिले गेलेले नाही; परंतु वाचकाला या प्रकरणांतून त्याची ओळख होऊ शकते. ध्वनिघटक किंवा अर्थघटक देताना साधारणपणे कमीत कमी घटकांचा वापर करून दोन ध्वनी किंवा शब्दांमधील फरक स्पष्ट करण्याची पद्धती आहे. मात्र हे तत्त्व या पुस्तकात सर्वच पाळले गेलेले दिसत नाही.

पुस्तकाच्या शेवटी मराठी-इंग्रजी व इंग्रजी-मराठी अशी परिभाषासूची दिलेली आहे. शब्दसूचीच्या उपयुक्ततेविषयी कोणाचेच दुमत होणार नाही; परंतु या पुस्तकातील सूचीमध्ये काही महत्त्वाचा चुका राहून गेल्या आहेत. शास्त्रीय लेखनात ही गंभीर बाब आहे. उदाहरणार्थ, पर्याय शब्द / समानार्थी शब्दकोश याचा अर्थ synonymous असा दिला आहे. आणखी काही चुकांचा उल्लेख येथे नमुन्यादाखल करत आहे.

संयुक्त क्रियापद utterance, receiver-ग्राहक, labitual behaviour-संस्कार.

शेवटी दिलेल्या संदर्भसूचीत मराठीतल्या फारच कमी संदर्भग्रंथांचा उल्लेख आहे. कालेलकरांचे मराठी ध्वनिव्यवस्थेवरील काम किंवा अशोक केळकरांचे भाषाविज्ञानावरील मूलभूत लेखन यांचा त्यात उल्लेखही नाही !

या पुस्तकाचा एक महत्त्वाचा दोष म्हणजे मुद्रितवाचनाच्या अनेक चुका. उदाहरणार्थ, इंग्रजी लेखकांचे व त्यांच्या पुस्तकांचे उल्लेख यांमध्ये स्पेलिंगच्या अनेक चुका आहेत. पृ. ४६ वर natural आणि mouton या दोन्ही शब्दांचे स्पेलिंग चुकले आहे. अनेक ठिकाणी या चुकांमुळे अर्थाचा अनर्थदेखील होतो. पृ. १४९ वर person in the chair च्या ऐवजी person in the chain असे छापले आहे. पृ. १४०वर प्रश्न विचारला आहे. 'मुक्त सपिम व बद्ध रूपिम म्हणजे काय ?'

सुगमता आणि वाचकाच्या बाबतीत मित्रत्वाचा दृष्टिकोण ही या पुस्तकाची बलस्थाने आहेत. परंतु ध्वनिशास्त्रावरील घटकांत असलेल्या काही चुका, चुकीच्या चिन्हांचा वापर, शब्दसूचीतील चुका आणि मुद्रितवाचनातील चुका यांमुळे वाचकाची दिशाभूल होण्याची मोठ्या प्रमाणात शक्यता आहे. पुस्तकाच्या पुढील आवृत्तीत वर दाखवलेल्या आणि इतरही चुका दुरुस्त झाल्यास पुस्तकाच्या उपयुक्ततेत निश्चितच वाढ होईल. ■

इंग्रजी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे 411007. दूरध्वनी 25690648

**पुस्तक-परीक्षण**

# सदोष तरीही उपयुक्त

**सोनल कुलकर्णी - जोशी**

[परीक्षित पुस्तक : 'सामाजिक भाषाविज्ञान', (२००६) लेखक डॉ. रमेश धोंगडे, दिलीपराज प्रकाशन प्रा.लि., पुणे. पृष्ठे १८९, किंमत रु. २००/- ]

आधुनिक भाषाविज्ञान या विषयाचा सैद्धांतिक विकास प्रामुख्याने पाश्चात्य देशांत झाला. सर्वसाधारणपणे किचकट समजल्या जाणाऱ्या या विषयावर मराठी भाषेत केवळ लेखन करणे नव्हे; तर या आधुनिक विद्याशाखेच्या संदर्भात मराठी भाषेचा विचार करण्याची उत्तम कामगिरी डॉ. रमेश धोंगडे यांनी बजावली आहे. त्यांचे शैलीविज्ञान या विषयावरचे लेखन सर्वांच्या परिचयाचे आहेच. प्रस्तुत ग्रंथाच्या रूपाने त्यांनी सामाजिक भाषाविज्ञानाच्या अंगाने केलेले मराठी संबंधीचे चिंतन आपल्यापुढे मांडले आहे. पुस्तकाचे उद्दिष्ट लेखकाच्याच शब्दांत सांगायचे झाले तर ''भाषेच्या अभ्यासकांना - विशेषत: मराठी भाषेच्या अभ्यासकांना - आधुनिक भाषाविज्ञानाच्या एका महत्त्वाच्या अंगाचा परिचय व्हावा आणि मराठी भाषेच्या संशोधनास प्रोत्साहन मिळावे'' हे आहे. लेखकाने स्वत: निश्चित केलेल्या या उद्दिष्टांच्या संदर्भातच प्रस्तुत पुस्तकाचे मूल्यांकन करण्याचा प्रयत्न इथे केला आहे.

भाषा व समाज यांच्यातील परस्परसंबंधाचा अभ्यास अनेक अंगांनी करता येतो/केला गेला आहे. सामाजिक भाषाविज्ञान (सा.भा.वि.) या क्षेत्रात यातील नेमका कुठला दृष्टिकोण अपेक्षित आहे हे लेखकाने प्रस्तावनेत स्पष्ट केले आहे. ''सामाजिक वर्गवारी, सामाजिक उतरंड यांच्याशी भाषा संबंधित असते; पण त्यांना जखडलेली नसते. सामाजिक शास्त्रातील समाजाचे वर्गीकरण हे भाषेचे तसेच वर्गीकरण करण्यास उपयुक्त नाही. भाषेचे वर्गीकरण हा भाषाविज्ञानाचा हेतू नाही.'' लेखकाने इथे सा.भा.वि.च्या संदर्भातील एका प्रचलित अपसमजाचा ओझरता उल्लेख केला आहे. धोंगडे यांच्या वरील विधानाला विशेषत: भारतीय सा.भा.वि.च्या संदर्भात एक ऐतिहासिक पार्श्वभूमी आहे हे इथे सांगावेसे वाटत. हे माहीत नसणाऱ्या वाचकांना कदाचित या विधानाचे महत्त्व पूर्णपणे आकलन होणार नाही. काही सा.भा. वैज्ञानिकांनी समाजातल्या वर्गीकरणाला समांतर असे भाषिक वर्गीकरण करण्यावर भर

दिला. त्यांनी भारतातील जातीय उतरंडी आणि त्यांत वापरल्या जाणाऱ्या भाषा यांचा अविभाज्य संबंध जोडण्याचा प्रयत्न केला. विशेषत: विलियम ब्राईटसारख्या अमेरिकन मानववंशशास्त्रज्ञांनी/सा.भा. वैज्ञानिकांनी यातूनच 'जातीबोली' ही चुकीची संकल्पना जन्माला घातली. परिणामत: १९६०च्या आसपास भारतीय सा.भा. विज्ञानात जातीबोलींचे अस्तित्व गृहित धरून त्यांचा वर्णनात्मक अभ्यास केला गेला. (पहा : फर्गसन आणि गम्पर्झ, १९६०). भारतातील सामाजिक बदल व त्यांचा भाषावापरावर होणारा परिणाम यांचा क्वचितच विचार केला गेला. (एम्.एल्. आपटे यांचा १९६२मध्ये प्रसिद्ध झालेला शोधनिबंध हा एक उल्लेखनीय अपवाद).

पुस्तकाचे उद्दिष्ट एकदा निश्चित केल्यानंतर ते साध्य करण्याच्या दृष्टीनेच लेखकाने संपूर्ण पुस्तकाची मांडणी केली आहे. पुस्तकात एकूण अकरा प्रकरणांचा समावेश आहे. प्रत्येक प्रकरण पाठ्यमुद्दे, उद्दिष्टे, विषयविवेचन, सारांश, पारिभाषिक शब्द, संदर्भसूची प्रकरणाधिष्ठित प्रश्न व उपक्रम या आठ भागांमध्ये विभागले आहे. अशा प्रकारच्या मांडणीमुळे या पुस्तकाचा पाठ्यपुस्तक किंवा स्वाध्याय-पुस्तक म्हणून उपयोग होऊ शकेल. पुस्तकाच्या शेवटी लेखकाने वापरलेले पारिभाषिक शब्द व त्यांचे इंग्रजी प्रतिशब्द यांची सूची दिली आहे (त्यातील काही प्रतिशब्द / प्रतिसंज्ञांच्या योग्यायोग्यतेचा विचार पुढे केला आहे.) त्याचबरोबर इंग्रजी-मराठी सूचीही दिलेली आहे. या दोन सूचींच्या मदतीने वाचकाला संकल्पना अचूकपणे समजावून घेता येतील.

प्रत्येक प्रकरण सा.भा.विज्ञानातील एका किंवा अनेक संकल्पनांच्या विवरणाला वाहिलेले आहे. (उदाहरणे पुढे दिली आहेत). संकल्पनांच्या मांडणीत सा.भा.वि. क्षेत्रात हळूहळू घडत गेलेली उत्क्रांती प्रतिबिंबित होते. 'भाषिक समाज' या साठच्या दशकात प्रभावी असलेल्या संरचनेपासून 'भाषा आणि सत्ता', 'भाषा औचित्य आणि संस्कृती' अशा अलीकडच्या विचारांपर्यंत हा प्रवास घडतो. या प्रवासाच्या ओघात सा.भा.वि.तील भाषा-संपर्क, बहुभाषिकता, वाचा-सरमिसळ, वाचापालट, भाषा आणि सत्ता, भाषा आणि जवळीक, भाषा आणि लिंगभेद अशा महत्त्वाच्या विषयांचा विचार होतो. भाषावापरात आढळणारी परिवर्तनशीलता शास्त्रीय दृष्टीने अभ्यासणे अशक्य आहे असा १९६०पर्यंत समज प्रचलित होता. सा.भा.वि.ने भाषेची परिवर्तनशीलता समजावून घेऊन ती शास्त्रीय अभ्यासाच्या परिघात आणता येते हे सिद्ध करून दाखविले. सा.भा.वि.तील या स्तुत्य प्रयत्नांचा उल्लेख लेखक करतातच; पण त्याचबरोबर या क्षेत्राच्या मर्यादांबाबत वाचकांना सावधही करतात. (पृ. ७९)

या पुस्तकाचे एक वैशिष्ट्य म्हणजे आतापर्यंतच्या मराठी सा.भा.वि.वरील लेखनात दुर्लक्षित राहिलेल्या 'संशोधनपद्धती'चा विचार. लेखकाने एक संपूर्ण प्रकरण

या विषयाला वाहिले आहे. या अंतर्गत त्याने प्रामुख्याने लबव्ह या अमेरिकन सा.भा.वैज्ञानिकाने विकसित केलेल्या 'परिवर्तनीय घटक' या संकल्पनेवर आधारित संशोधन-पद्धतीचे वर्णन केले आहे. मिल्रॉय यांच्या 'पर्यायी पद्धती'चा ओझरता उल्लेख आहे. वास्तविक पाहता अलीकडच्या संशोधनात या दोन पद्धती परस्परपूरक मानून एकत्रितपणे वापरल्या गेल्या आहेत. (पहा : मिल्‌रॉय आणि मिल्‌रॉय, १९९२; एकर्ट, २०००) मराठीतील सामाजिक व भाषिक बदल यांच्यातील परस्परसंबंध समजावून घेण्यासाठी या संयुक्त संशोधनपद्धतीचा निश्चितच उपयोग करता येईल. जाताजाता इथे नोंद करावीशी वाटते, की पृ. १३८-१४०वर लेखकाने परिवर्तनीय घटक व त्यांचे पर्याय लिहिण्याची जी पद्धत दिली आहे ती बरोबर नाही. (कदाचित हा मुद्रणदोष असू शकेल.) पृ. १४०वर दिलेल्या उदाहरणानुसार [न्/ण्] हा परिवर्तनीय घटक झाला तर [न्/ण्] : [न्] म्हणजे [न्] व [ण्] या घटकाचा [न्] हा पर्याय झाला. हेच उदाहरण 'मान्य' स्वरूपात द्यायचे झाल्यास परिवर्तनीय घटक (न्/ण्) असा तर पर्यायी घटक [न्] असा लिहिला जातो (पहा : हड्सन, १९८६ : १४२; चेंबर्स, १९९७ : १७)

विशेषत: भाषेच्या अभ्यासकांसाठी लिहिले गेलेले हे पुस्तक सा.भा.वि.तील महत्त्वाच्या संकल्पनांची ओळख करून देते. या दृष्टीने पुस्तकाला पुरेशी 'व्याप्ती' आहे असे म्हणता येईल. विषयाच्या सखोलतेची कल्पना देण्यात मात्र पुस्तक तितकेसे यशस्वी होत नाही. उदाहरणार्थ पुस्तकाचे लक्षणीय वैशिष्ट्य म्हणून पुस्तकात समाविष्ट केलेल्या संशोधनपद्धतीवरील प्रकरणाचा वर उल्लेख केला आहे. भाषासंशोधनाला उत्तेजन मिळण्याच्या दृष्टीने लिहिल्या गेलेल्या पुस्तकात भाषा-संशोधन पद्धतींचा व आजवर झालेल्या भाषा-संशोधनाचा अधिक सखोलतेने विचार व्हावयास हवा होता. लेखक केवळ लबव्ह यांच्या पहिल्या, केवळ सहा तासात पूर्ण केलेल्या प्रयोगात्मक संशोधनाचे विवरण करतात. लबव्ह यांचेच नंतरचे अधिक शिस्तबद्ध संशोधन, त्यांच्या संशोधन पद्धतीवर आधारित इतर अभ्यासकांचे संशोधन व यातून लक्षात येत गेलेल्या या संशोधनपद्धतीच्या मर्यादा यांची चर्चा कुठेही करत नाही. वास्तविक लबव्ह यांच्या संशोधन पद्धतीच्या मर्यादा लक्षात घेऊनच पर्यायी पद्धती विकसित करण्यात आल्या. त्यांचा उल्लेख वर केला आहे. भावी संशोधकांच्या दृष्टीने अत्याधुनिक संशोधनपद्धतींचा विचारही होणे आवश्यक वाटते.

लेखनात वापरलेल्या संदर्भांमध्ये साहजिकच पाश्चात्य संशोधनावर अधिक भर आहे. मराठीतील सा.भा. वैज्ञानिक संशोधनाची पुरेशी कल्पना देण्यात मात्र प्रस्तुत पुस्तक कमी पडते. लेखक स्वत:च्या व स्वत:च्या दोन विद्यार्थ्यांच्या कामाचा उल्लेख

करतात. मात्र ना.गो. कालेलकर, डॉ. ए.एम.घाटगे, डॉ. अशोक केळकर यांच्या सारख्या मराठी भाषावैज्ञानिकांची तसेच एम.एल. आपटे (मुंबई मराठीचा अभ्यास), मॅक्सिन बर्नसन (फलटणच्या मराठीचा अभ्यास), के. एस. राज्यश्री (मराठीचे प्रमाणीकरण), माधव देशपांडे (मराठी वाङमयातून प्रतीत होणाऱ्या मराठी भाषकांच्या सामाजिक-भाषिक मानसिकतेचा ऐतिहासिक अभ्यास) यांची अनुपस्थिती प्रकर्षाने जाणवते. संशोधनाचा आद्यबिंदू म्हणून या पुस्तकाचा अभ्यास करू पाहणाऱ्या संशोधकाची त्यामुळे दिशाभूल होण्याचा संभव आहे. मराठी भाषेत/भाषेचे सा.भा. वैज्ञानिक संशोधन-कार्य झालेलेच नाही असा गैरसमज होऊ शकतो.

पुस्तकाच्या शेवटी मराठी प्रतिसंकल्पनांची/प्रतिशब्दांची सूची देण्याचा प्रयत्न स्तुत्य आहे. ही सूची देताना लेखकाने भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई यांच्या विद्यमाने तयार केलेल्या 'भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या परिभाषा कोश' या पुस्तकाशी सुसंवाद राखण्याचा प्रयत्न केला असता तर संशोधक विद्यार्थ्यांना एकमेकांशी सुसंवाद राखण्याच्या दृष्टीने मदत झाली असती. शेवटी अभ्यासकांनाही एक 'समान भाषा' असणे गरजेचे आहे. काही प्रतिशब्द हे इंग्रजी शब्दांना/कल्पनांना समर्पक आहेत असे वाटत नाही. उदाहरणच द्यायचे झाल्यास 'धुरीण' हा सर्वस्वी सकारात्मक मराठी शब्द 'hegemony' या शब्दाच्या उघड नकारार्थाशी फटकून आहे. 'Linguistic competence' या संज्ञेतील competenceची नैसर्गिक उपलब्धता 'भाषिक विवेक'शी सुसंवादी वाटत नाही. 'विवेक' हा नैसर्गिक पेक्षा प्रयत्नाने साध्य केला जाणारा गुणधर्म आहे (तुलनेने कोशातील 'भाषिक सामर्थ्य' हा प्रतिशब्द जास्त समर्पक वाटतो). बहुभाषिकता (बायलिंग्वलिझम) असमतोल भेट (डिस्कोर्सल इनइक्वालिटी), भाषात्याग (लँग्विज शिफ्ट) ही आणखी काही उदाहरणे देता येतील.

बारकाईने वाचल्यास या पुस्तकात अनेक मुद्रणदोष आढळतात. विशेषत: इंग्रजी संदर्भ, लेखक, प्रकाशक व पुस्तके यांच्या नावांच्या उल्लेखामध्ये चुका झाल्या आहेत. पाठ्यपुस्तक किंवा स्वाध्यायपुस्तक म्हणून हे पुस्तक वापरू पाहणाऱ्या वाचकांच्या दृष्टीने या नजरचुका अक्षम्य वाटतात. पृष्ठ ९६ वरील उताऱ्यात 'उमेदवारां'चे मनोगत 'सदस्या'च्या भाषणात चुकीने घातले गेले आहे. पुस्तकाची पुढील आवृत्ती तयार करताना प्रकाशकाने या चुका टाळाव्यात.

पुस्तकातील या त्रुटी गृहित धरूनही मराठी सा.भा.वि. संबंधातील लिखाणात या पुस्तकाचे महत्त्व मान्य करावे लागेल. लेखकाच्या अध्ययन, अध्यापन व संशोधनविषयक प्रदीर्घ अनुभवाची प्रचीती या पुस्तकात ठिकठिकाणी येते- विशेषत: लेखकाने योजलेली 'भाषाशैली' ही नवसंशोधकांशी जवळीक साधणारी आहे.





अनुक्रमणिका

पुस्तकातले विवेचन रूक्ष पण्डिती सैद्धान्तिक चर्चेपासून दूर राहते. सहज सुलभ भाषेतून विषय उलगडत जातो. मराठी भाषाप्रयोगाची मूर्त व मनोरंजक उदाहरणे लेखकाने चातुर्याने पेरली आहेत. त्यामुळे मराठी वाचक सर्वप्रथम त्याला परिचित अशा भाषिक-सामाजिक उदाहरणांशी जवळीक साधतो; त्याचबरोबर मराठीपलीकडे पसरलेल्या भाषाविषयक संशोधन क्षेत्रातील घडामोडींचेही ओझरते दर्शन त्याला घडते.

**परीक्षणात वापरलेले संदर्भ :**


आपटे, एम्.एल्. (१९६२). 'लिंग्विस्टिक अकल्चरेशन अँड इट्स रिलेशन्स टू अर्बनायजेशन अँड सोसियो-इकनॉमिक फॅक्टर्स' इंडियन लिंग्विस्टिक्स २३:५-२५

एकर्ट, पी. (२०००). 'लिंग्विस्टिक वेरियेशन अॅज सोशल प्रॅक्टिस.' ब्लॅकवेल : इंग्लंड.

चेंबर्स, जे. (१९९७). 'सोसियोलिंग्विस्टिक थियरी' ब्लॅकवेल : ऑक्सफर्ड.

फर्गसन्, सी. आणि जे. गम्पर्झ (संपादक) (१९६०). 'लिंग्विस्टिक डायव्हर्सिटी इन साउथ एशिया' इंटरनॅशनल जर्नल ऑफ अमेरिकन लिंग्विस्टिक्स २६.३ भाग २

ब्राईट, डब्ल्यू. (१९६०). 'अ स्टडी ऑफ कास्ट अँड डायलेक्ट इन म्हैसूर' इंडियन लिंग्विस्टिक्स् २१:४५-५०

भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या परिभाषा कोश. भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई. मे, २००१.

मिल्रॉय, एल् आणि जे. मिल्रॉय (१९९२). 'सोशल नेटवर्क अँड सोशल क्लास टुवर्ड अॅन इंटिग्रेटेड सोसियोलिंग्विस्टिक मॉडेल' लँग्विज इन सोसायटी २१:१-२६

हड्सन आर. (१९८६). सोसियोलिंग्विस्टिक्स. केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस : केंब्रिज.


■


**प्रपाठक, भाषाविज्ञान विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे 411006**
Email : sonalkulk@rediffmail.com.

**प्रतिसाद**

# प्रशांत बागड यांचे अज्ञानमूलक सौंदर्यशास्त्र

**मिलिंद मालशे**

''कॉलिंगवुडवर लादलेला मराठी अवतार'' हे प्रशांत बागड यांनी लिहिलेले परीक्षण (भाषा आणि जीवन, २५:३, पृ. २४-२९) म्हणजे कॉलिंगवुडचा मूळ ग्रंथ आणि आम्ही केलेले त्याचे भाषांतर हे दोन्ही वरवर चाळून लिहिलेले परीक्षण आहे. बागड यांची आवेशपूर्ण व आक्रमक शैली आणि एकूण कॉलिंगवुडच्या तत्त्वज्ञानावर आपली किती जबरदस्त पकड आहे, असा त्यांनी आणलेला आव पाहता या परीक्षणामध्ये काही महत्त्वाचे मुद्दे उपस्थित होतील असे वाटले होते; परंतु थोडेसे खोल खणताच कॉलिंगवुड याच्या 'प्रिन्सिपल्झ ऑफ आर्ट' या ग्रंथात मांडलेल्या विचारांचे बागड यांचे आकलन किती निरागस आहे, हे स्पष्ट दिसते, आणि त्यामुळेच भाषांतराविषयी त्यांचे परीक्षणही बव्हंशी शेरेबाजीचे झालेले आहे.

**(१) विश्लेषणात्मक तत्त्वज्ञान आणि काँटिनेंटल तत्त्वज्ञान :**

कॉलिंगवुडचा समावेश तत्त्वज्ञानाच्या कोणत्या प्रवाहात करावा, हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. खरं म्हणजे पाश्चात्य तत्त्वज्ञानाची तोंडओळख असणाऱ्याला आणि कॉलिंगवुडचे मुळातील इंग्लिश लेखन तसेच रा.भा. पाटणकरांचे मराठीतील लेखन यांचे नीट वाचन केलेल्या व्यक्तीला याविषयी फारसा पेच पडू नये. या बाबतीत बागड मात्र वाट चुकले आहेत. आधुनिक पाश्चात्य तत्त्वज्ञानामधील विश्लेषणात्मक तत्त्वज्ञान आणि काँटिनेंटल तत्त्वज्ञान या दोन प्रवाहांचा उल्लेख बागड यांनी त्यांच्या परीक्षणामध्ये कॉलिंगवुड यांच्या संदर्भात (पृ.२४) आणि रा.भा. पाटणकर यांच्या संदर्भात (पृ.२५) केलेला आहे. हे दोन्ही उल्लेख ज्या पद्धतीने बागड करतात त्यावरून त्याविषयीचे त्यांचे आकलन संशयास्पद असल्याचे स्पष्टच दिसते. पहिला उल्लेख : ''...विश्लेषक तत्त्वज्ञानाच्या ऐन धामधुमीत - व बालेकिल्ल्यात (तत्कालीन ऑक्स्फर्ड)- आज इंग्रजीभाषिक देशांत 'काँटिनेंटल तत्त्वज्ञान' म्हणून उल्लेखिल्या (व पुष्कळ अंशी हेटाळल्या) जाणाऱ्या परंपरेशीही सलगी साधणारं कलेचं तत्त्वज्ञान काँलिंगवुड यांनी मांडलं'' (२४) फेनमेनॉलजी (घटितार्थशास्त्र) आणि एक्झिस्टेन्शलिझम् (अस्तित्ववाद) हे दोन प्रवाह काँटिनेंटल तत्त्वज्ञानाचे प्रवाह म्हणून ओळखले जातात.





अनुक्रमणिका

या प्रवाहांशी जर कॉलिंगवुडचा सलगीचा संबंध ते जोडत असतील तर त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या आकलनाला दादच द्यावी लागेल !

विश्लेषक तत्त्वज्ञान कशाला म्हणतात आणि कॉंटिनेंटल तत्त्वज्ञान कशाला म्हणतात याविषयी बागडांनी येथे घातलेला गोंधळ ऐतिहासिक आणि तात्त्विक अशा दोन्ही पातळ्यांवरचा गोंधळ आहे. या गोंधळावर उतारा म्हणून थोडी ऐतिहासिक पार्श्वभूमी स्पष्ट करू. विसाव्या शतकामध्ये प्रामुख्याने दोन ठळक विचारधारा तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात निर्माण झाल्या. (मात्र दोहोंच्या मागे मूळ जर्मन तत्त्वज्ञच होते!) एक म्हणजे फ्रेगऽ (१८४८-१९२५) याची तार्किक विश्लेषणावर भर देणारी विश्लेषक तत्त्वज्ञानाची धारा रसेल, मूर आणि विटगनस्टाइन यांच्याद्वारे इंग्लंड व अमेरिकेमध्ये बरीच पसरली. दुसरी हुसर्ल (१८५९-१९३८) याची घटितार्थशास्त्रीय विश्लेषणावर भर देणारी कॉंटिनेंटल तत्त्वज्ञान म्हणून ओळखली जाणारी विचारधारा. हायडेगर, सार्त्र आणि मर्लु-पाँटि यांनी या विचारधारेमध्ये अस्तित्ववादी तत्त्वांची भर घातली आणि त्यातून तिचा युरोपात प्रसार झाला. अगदी अलीकडे देरिदा या फ्रेंच तत्त्वज्ञाच्या विरचना (डिकन्स्ट्रक्शन) या प्रवाहाची भर कॉंटिनेंटल विचारधारेत पडलेली आहे. विश्लेषक आणि कॉंटिनेंटल हे दोन्ही प्रवाह आपापल्या परीने एकोणिसाव्या शतकातील ॲब्सल्यूट आयडिअलिझम (विश्वचैतन्यवाद किंवा केवळ चिद्वाद) या मुख्य प्रवाहाविरुद्ध भूमिका घेत होते, ही गोष्ट येथे ध्यानात ठेवली पाहिजे. (हेगल आणि हुसर्ल या दोहोंच्या फेनमेनॉलजीच्या सिद्धांतामध्ये जमीन-अस्मानाचा फरक आहे, हे बागड यांनी ध्यानात घ्यावे !)

कॉलिंगवुडच्या संदर्भात बागड यांना हाच आयडिअलिझम अभिप्रेत असावा आणि त्यालाच ते बेधडक कॉंटिनेंटल तत्त्वज्ञान म्हणत असावेत ! कॉलिंगवुड हा आयडिअलिझमशी संबंधित होता, कॉंटिनेंटल तत्त्वज्ञानाशी नव्हे. विश्लेषक तत्त्वज्ञानाचे प्रमुख प्रणेते म्हणजे जी.ई. मूर (१८७३-१९५८) आणि विटगनस्टाइन (१८८९-१९५१) कॉलिंगवुड (१८८९-१९४३) हे त्यांचे जवळजवळ समकालीनच होते; परंतु मूर यांचा उल्लेख ते संपूर्ण ग्रंथामध्ये फक्त एकदाच करतात आणि विटगनस्टाइनचा एकदाही करीत नाहीत. नेमकेपणे बोलायचे तर कॉलिंगवुड यांचे भांडण मूर-विटगनस्टाइन यांच्या विश्लेषक तत्त्वज्ञानाशी नव्हतेच. त्यांचे भांडण होते ते आधीच्या एम्पिरिसिस्ट (अनुभववादी) परंपरेशी. लॉक, बार्कली व ह्यूम या ब्रिटिश एम्पिरिसिस्ट तत्त्वज्ञांचे इतके उल्लेख कॉलिंगवुडच्या लेखनात येतात त्याचे कारण हेच आहे. तेव्हा, कॉंटिनेंटल फिलॉसॉफीशी (म्हणजे हुसर्ल, हायडेगर, सार्त्र इत्यादी विचारवंतांच्या परंपरेशी) कॉलिंगवुड याची सलगी तर सोडाच, दूरान्वयानेही काही संबंध नाही. त्यांची ''सलगी''

आहे ती कांट, बोझंकिट आणि क्रोचे यांच्याशी ! आणि या सलगीविषयी बागड पूर्णपणे अंधारात आहेत, याला मी पुढे पुरावा देणारच आहे.

**(२) रा.भा. पाटणकर आणि कॉंटिनेंटल तत्त्वज्ञान :**

बागड यांनी रा.भा. पाटणकरांच्या लेखनाच्या बाबतीतही अगदी हाच गोंधळ घातलेला आहे. ''पाटणकरांची सौंदर्यमीमांसा विश्लेषक तत्त्वज्ञानाच्या फेऱ्यांतून अजिबात सुटू शकली नाही; पण काण्ट, क्रोचे अणि कॉलिंगवुड यांच्यावरील भाष्यत्रयी ही पाटणकरांनी मराठीला दिलेली मौलिक कॉंटिनेंटल मेजवानी आहे.'' (२५)

येथेही बागड यांची दुहेरी गफलत झालेली आहे. एक म्हणजे पाटणकरांच्या मेजवानीचा आस्वाद घेताना बागड यांचे तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचे आणि तात्त्विक चौकटीचे भान पूर्ण सुटलेले आहे ! पाटणकर कॉंटिनेंटल तत्त्वज्ञानावर (म्हणजे हुसर्ल, हायडेगर, सार्त्र इत्यादी विचारवंतांच्या परंपरेवर) लेखन करीत नव्हते. ते लिहीत होते स्वायत्ततावादी आणि विश्वचैतन्यवादी सिद्धांत मांडणाऱ्या तत्त्वज्ञांवर. पण बागड तर या दोन परंपरा एकच आहेत, असे मानत आहेत.

दुसरे म्हणजे बागड यांना पाटणकर कोणत्या भूमिकेतून मांडणी करीत आहेत, याचेच भान नाही. पाटणकरांनी सौंदर्यमीमांसा लिहिताना विश्लेषक तत्त्वज्ञांच्या पद्धतींचा वापर केलेला आहे, यात काहीच शंका नाही. परंतु ती विश्लेषक तत्त्वज्ञानाच्या फेऱ्यात वगैरे काही सापडलेली नाही. या ग्रंथाचा गाभा असणारी द्विध्रुवात्मकतेच्या तत्त्वाची (म्हणजे लौकिकतावाद व स्वायत्ततावाद या ध्रुवांची) मांडणी ही विश्लेषक तत्त्वज्ञानाची मांडणी नव्हे, हे बागड यांच्या ध्यानात आलेले नाही. याचे मुख्य कारण म्हणजे त्यांचा पाटणकरांच्या लेखनाशी असणारा परिचय फार जुजबी स्वरूपाचा, केवळ लेबल लावण्यापुरता आहे. स्वायत्ततावादाला पूर्वपक्ष म्हणून स्थान देऊन त्याची चोखपणे मांडणी करून त्याचे खंडण पाटणकरांनी केले ते विश्लेषक तत्त्वज्ञानाच्या आधारे केले, आणि त्याला विरोधी अशा लौकिकतावादी सौंदर्यशास्त्राची उत्तरपक्ष म्हणून मांडणी केली ती स्पेक्युलेटिव पद्धतीने केली, असे पाटणकरांच्या एकूण लेखनप्रकल्पाचे स्वरूप होते. विशेषतः सौंदर्यमूल्याच्या चर्चेच्या संदर्भात पाटणकर विश्लेषक तत्त्वज्ञानामध्ये अजिबात न बसणारी अशी अगदी वेगळी इंट्युइशनिस्ट भूमिका घेतात, हे बागड यांच्या गावीही नाही.

**(३) अभिव्यक्तीचा सिद्धांत : इमोशन आणि फीलिंग**

कॉलिंगवुडच्या एस्क्प्रेशनिस्ट (आविष्कारवादी वा अभिव्यक्तिवादी) सिद्धांताचे आकलन बागड यांना झालेले नाही. कॉलिंगवुडच्या सिद्धांताच्या ''साध्या पण चोख आग्रहा''विषयी विवेचन करताना ते म्हणतात : ''कला म्हणजे भावनांची अभिव्यक्ती,

हे कुणाला माहीत नसते ?... भावनेची अभिव्यक्ती आणि भावना या दोन भिन्न गोष्टी नसतात. ...लेखक माध्यमाचे कानेकोपरे धुंडाळतो, प्रयोग करतो ते अंतिमत: स्वत:च्या भावनांचं रहस्य उकलण्यासाठी.'' (२४) भावना, अभिव्यक्ती, माध्यम, प्रयोग, रहस्य या सगळ्या संकल्पनांचा एकच गोंधळ बागड यांच्या डोक्यात झालेला आहे.

कॉलिंगवुडने आपल्या ग्रंथाच्या पहिल्या भागात पुढील भूमिका मांडलेली आहे : ''...a work of art may be completely created when it has been created as a thing whose only place is in the artist's mind'' (p.130) ही भूमिका काण्ट व क्रोचे यांच्या परंपरेत रुजलेली आहे. कॉलिंगवुडच्या या विधानामध्ये चमत्कारिक असे काहीच नाही. परंतु, ''खरी कलाकृती कलावंताच्या डोक्यात असते. जगात नसते; ती केवळ कल्पनाजन्य वा काल्पनिक वस्तू असते; भौतिक कलाकृती ही दुय्यम व बिनमहत्त्वाची चीज असते'' हे कॉलिंगवुडचे प्रतिपादन बागड यांना ''एक चमत्कारिक आशयसूत्र'' वाटते (२५). याचे मुख्य कारण वर म्हटल्याप्रमाणे काण्ट-क्रोचे-कॉलिंगवुड या सौंदर्यशास्त्रीय परंपरेविषयीचे बागड यांचे प्रगाढ अज्ञान हेच आहे.

बागड यांना पाश्चात्य तत्त्वज्ञानाची नीटशी माहिती नसल्याने एक्स्प्रेशन आणि फीलिंग या संज्ञांचा तत्त्वज्ञानाच्या परंपरेतील अर्थ समजलेला नाही. बाह्य वस्तूमध्ये विशिष्ट माध्यमाद्वारे भावनांचा झालेला आविष्कार म्हणजे एक्स्प्रेशन नव्हे, आणि फीलिंग म्हणजे भावना नव्हे. पाटणकरांनी भाव/भावना हे शब्द इमोशन या संकल्पनेसाठी वापरले आहेत तर फीलिंग त्यापासून वेगळी असल्याने मराठीत फीलिंग असाच शब्द ठेवला आहे (६७). त्यांनी इमोशन व फीलिंग यांतील भेदही स्पष्ट केला आहे (६९-७०).

आमच्या भाषांतरामध्येही ''इमोशन''साठी ''भावना'' तर ''फीलिंग''साठी ''संवेदना'' (एके ठिकाणी ''भावप्रत्यय'') अशा संज्ञा वापरलेल्या आहेत. फीलिंगमध्ये सेन्सेशन आणि इमोशन असे दोन्ही घटक असतात हे कॉलिंगवुडने स्वत:च स्पष्ट केलेले आहे. फीलिंग या संकल्पनेची चर्चा करताना तो म्हणतो : "If we now consider feeling by itself, we find that there are two different kinds of experience each of which goes by that name. First, we say that hot and cold, hard and soft, are things that we feel; ... we describe ... the common activity which is specialized into them as sensation. ...Secondly we speck of feeling pleasure or pain, anger, fear and so forth. ... let us call it emotion." (p.160)

सेन्सेशन व इमॅजिनेशन या संकल्पनेची चर्चा करताना तो म्हणतो : "This common-sense distinction [between, for example, 'really seeing' a patch of colour and ' imagining one'] when we examine it will be found very obscure. My own terminology in this chapter will be as follows. As a generic term to cover both the act of 'really seeing' and the act of 'imagining', I shall use the word 'sensation'. When I need a verb, I shall use the verb 'to sense'. That which we sense I shall call a 'sensum'. The various species of sensation I shall call 'seeing', 'hearing', 'smelling'. &c., and the corresponding species of sensa 'colours', 'sounds', 'scents', &c,; in every case irrespective of the distinction between the two cases distinguished at the beginning of this chapter.' (p.173)

मुळातला तात्त्विक भेद आणि इंग्लिशमध्ये कोणत्या संज्ञा वापरायच्या यासंबंधीचा निर्णय, या दोन्ही गोष्टी कॉलिंगवुडला स्वत:लाच किती जड जात होत्या, हे यावरून सहज लक्षात येईल. कधी 'रिअल सेन्सेशन' (p.173) तर कधी 'रिअल सेन्सा' (p.194) अशा संज्ञा त्याला वापराव्या लागलेल्या आहेत. फीलिंगमध्ये कॉलिंगवुडला अभिप्रेत असलेल्या जोड-अर्थासाठी ''भावप्रत्यय'' असा शब्द निश्चित करून प्रारंभी भाषांतर केले होते; परंतु हा शब्द मराठीमध्ये मुद्दाम कृत्रिमपणे तयार केल्यासारखा वाटतो, व त्यामुळे तो अनेक संदर्भांमध्ये (विशेषत: फील हे क्रियापद म्हणून आले की) सहजपणे वापरता येत नाही. शिवाय स्वत: कॉलिंगवुडची वरील दुसऱ्या परिच्छेदातील भूमिका पाहता सेन्सेशन आणि फीलिंग या दोहोंसाठी संवेदना, इमोशनसाठी भावना, आणि सेन्सम/सेन्सा यासाठी वेदनक अशा संज्ञा मराठी भाषांतरामध्ये वापरलेल्या आहेत.

आमच्या भाषांतरासाठी पाटणकरांच्या भाष्याची झालेली मदत बागड यांना मी खरोखरीच दाखवू शकणार नाही; कारण मूळ तत्त्वज्ञानात्मक विचारचौकटीचे आणि पाटणकरांच्या लेखनाचे बागड यांचे आकलन अत्यंत संशयास्पद आहे. पाटणकरांनी आपल्या कॉलिंगवुडवरील भाष्यामध्ये वाचकांना सावध करताना म्हटले आहे : ''कॉलिंगवुडच्या पुस्तकातील पहिला भाग वाचकाला सोपा वाटला असणार; कारण फक्त कलेच्या क्षेत्रात निर्माण होणाऱ्या प्रश्नांची त्यात चर्चा होती. ते प्रश्न व त्यांची कॉलिंगवुडने केलेली उकल या दोहोंना तत्त्वज्ञानात्मक अंग आहे. या अंगाची चर्चा भाग २ मध्ये प्रामुख्याने येते. तत्त्वज्ञानाची बऱ्यापैकी माहिती नसल्यास ही चर्चा वाचकास कठीण वाटणे शक्य आहे'' (६६). बागड यांनी कॉलिंगवुड याच्या मूळ

पुस्तकाचे वाचन केलेले दिसतच नाही. केवळ वरवर चाळून या पुस्तकाची त्यांनी ओळख करून घेतलेली आहे. परीक्षणाच्या पहिल्याच परिच्छेदात त्यांनी कॉलिंगवुडचा ''अभिव्यक्तीचा सिद्धांत'' या नावाखाली जो गोंधळ घातलेला आहे त्यावरून हे अगदी स्पष्ट होते.

अंतर्मन ही संकल्पना कॉलिंगवुडच्या गावीही नाही. आणि ती खास मराठी संकल्पना आहे, असेही मत बागड यांनी मांडलेले आहे. एक म्हणजे ''अंतर्मन'' ही खास ''मराठी'' संकल्पना आहे, हा बागड यांचा दावा अनाकलनीय आहे. दुसरे म्हणजे मन, अंतर्मन या संकल्पना आयडियलिस्ट तत्त्वज्ञानामध्ये निश्चितच आहेत. कॉलिंगवुडने ''सायकि'' व ''सोल'' या संज्ञा समानार्थी मानून त्यांना ''स्पिरिट'' या संज्ञेपासून वेगळे काढले आहे; 'सायकि' किंवा ''सोल'' या संज्ञा फीलिंगच्या पातळीवर असतात तर 'स्पिरिट' थिंकिंगच्या पातळीवर असते, असा भेद कॉलिंगवुडने केलेला आहे. भाषांतरामध्ये ''सायकि''साठी मानस, ''सोल''साठी आत्मा, तर ''स्पिरिट''साठी चैतन्य, अशा संज्ञा वापरलेल्या आहेत. ''सायकिकल लेव्हल'' म्हणजे काय, याविषयी कॉलिंगवुडची पुढील भूमिका पाहा :

"In using that name I am alluding to the traditional distinction between 'psyche' or 'soul' and 'spirit', taken as corresponding with my own distinction between feeling and thinking. ... I shall in this book use the word 'feeling' only with reference to the psychical level of experience, and not as a synonym for emotion generally." (p. 164)

खरे म्हणजे ''माध्यम'', ''वाचक'' इत्यादी संकल्पनांना एक्स्प्रेशनिस्ट सिद्धांतामध्ये फारसे स्थान नाही. ''एक्स्प्रेशन'' म्हणजे मनामध्ये निर्माण झालेली विशिष्ट, अनन्य प्रतिमा, असा अर्थ क्रोचे व कॉलिंगवुड (ग्रंथाचा पूर्वार्ध) या दोघांनाही अभिप्रेत आहे. मात्र आपल्या ग्रंथाच्या उत्तरार्धात कॉलिंगवुडने याच्याशी विसंगत अशी भूमिका घेतलेली आहे.

पाटणकरांच्या भाष्यामध्ये या विसंगतीविषयी विवेचनही आहे (१२६-४३) 'प्रिन्सिपल्झ ऑफ आर्ट' या ग्रंथातला कॉलिंगवुडचा प्रवास क्रोचे ते बोझंकिट असा झाला आहे, (१४३) हे पाटणकरांचे या संदर्भामधील भाष्यही मार्मिक आहे. परंतु ते समजण्यासाठी बागड यांना कॉंटिनेंटल तत्त्वज्ञानाच्या फेऱ्यातून बाहेर पडून क्रोचे आणि बोझंकिट यांचेही चोख वाचन करावे लागेल. (मराठीमध्ये बोझंकिटचे कमल देसाई यांनी केलेले भाषांतर उपलब्ध आहे.)

**(४) भाषांतरातील दोष**

मूळ तात्त्विक आणि ऐतिहासिक बैठक इतकी कच्ची असताना भाषांतराविषयी बागड यांनी घेतलेले आक्षेप खरे तर फारसे गंभीरपणे घेताच येणार नाहीत. कारण बागड यांना केवळ मराठी भाषा येते यावरच आपल्याला विसंबून राहावे लागेल. परंतु येथेही बागड यांची वाचनपद्धती कशी आहे त्याचे स्पष्टीकरण मिळते. तेव्हा त्यांचे भाषांतरावरचे काही आक्षेप तपासू.

भाषांतराच्या पृ. ४४-४५ वरील मजकूर त्यांनी उद्धृत केला आहे. ''ब्यूटि'', ''ब्यूटिफुल'' आणि ''इस्थेटिक'' यावरील कॉलिंगवुड यांचे मूळ विवेचन पाहा :

"The words 'beauty', 'beautiful', as actually used, have no aesthetic implication. We speak of a beautiful painting or statue, but this only means an admirable or excellent one. Certainly the total phrase 'a beautiful statue' conveys an implication of aesthetic excellence, but the aesthetic part of this implication is conveyed not by the word 'beautiful' but by the word 'statue.' The word 'beautiful' is used in such a case no otherwise than as it is used in such phrases as 'a beautiful demonstration' in mathematics or 'a beautiful stroke' at billiards. These phrases do not express an aesthetic attitude in the person who uses them towards the stroke or the demonstration; they express an attitude of admiration for the thing well done, irrespective of whether that thing is an aesthetic activity, an intellectual activity, or a bodily activity." (pp. 38-39)

बागड यांनी हा परिच्छेद न वाचताच फक्त पहिले वाक्य त्यापासून तोडून आधीच्या विवेचनाशी ते जोडले आहे आणि ''सौंदर्यमीमांसकाचं नावच सांगतं की त्याचा प्रधान उद्योग सौंदर्याची मीमांसा करणं हा आहे,'' असा एक आक्षेप आमच्या भाषांतरावर घेतलेला आहे. वरील उद्धृतामध्ये कॉलिंगवुडचा मूळ मुद्दा असा आहे : सौंदर्य असा कोणताही गुण वस्तूंमध्ये वा कृतींमध्ये अस्तित्वात नसतो; सुंदर, सौंदर्य या विशेषणांचा उपयोग अनेकदा (उदाहरणार्थ, गणिताच्या किंवा बिलियर्ड्स या खेळाच्या संदर्भात) केला जातो तेव्हा तो केवळ एखाद्या गोष्टीची वा कृतीची फक्त स्तुती करण्यासाठी वापरला जातो. त्याची सौंदर्यात्मकता, किंवा त्यातील सौंदर्यगुण व्यक्त करण्यासाठी नव्हे. कॉलिंगवुडचा हा मूळ मुद्दा भाषांतरातून व्यवस्थित स्पष्ट झालेला आहे.

कॉलिंगवुडचे मूळ पुस्तक बागड यांनी किती वरवर चाळले आहे, याचा आणखी एक पुरावा पाहा. भाषा आणि जाणीव या दोन्ही संज्ञांच्या प्रवेशसमयीच्या वाक्यांत विसर्ग आहे. आणि ही विसर्गचिन्हे भाषांतरामध्ये गायब झाल्यामुळे या दोन संज्ञांचं

संज्ञापण धुळीस मिळतं, अशी त्यांची तक्रार आहे (२८). बागड यांची दृष्टी अधू तरी असावी किंवा कावीळग्रस्त तरी असावी. मुळात प्रवेशसमयी विसर्ग नसून संज्ञा संपल्यानंतर आहे ! शिवाय, विसर्गामुळे संज्ञा तांत्रिक ठरतात हा बागड यांनी लावलेला शोध अज्ञानमूलक आहे. मुळातील इंग्लिश वाक्ये पाहा : "This is an activity which has something to do with the thing we call language: he expresses himself by speaking. It has also something to do with consciousness: the emotion expressed is an emotion of whose nature the person who feels it is no longer conscious." (pp. 109-10)

उद्‌धृते सोडली तर विसर्गचिन्ह देऊन पुढे संपूर्ण वाक्य देण्याची मराठीची प्रकृती नाही. वरील वाक्यांतील विसर्गचिन्हांऐवजी पूर्णविराम दिल्यामुळे या संज्ञांच्या तांत्रिक स्वरूपाला (संज्ञांच्या संज्ञापणाला!) कोणतीही बाधा येत नाही. खरे म्हणजे इंग्लिशमध्येही ती आली नसती. ''स्पीकिंग'' म्हणजे बोलणे, यातही बागड यांना ''कर्कश'' काय वाटले ते समजायला मार्ग नाही.

आमच्या भाषांतरामध्ये दोष आहेतच आणि त्याची जबाबदारी भाषांतरकार म्हणून घ्यायलाच हवी. पृ. १२८-२९ वरील भाषांतरामध्ये ''म्हणणाऱ्याहून'' हा मुद्रणदोष आहे, ''म्हणण्याहून'' असे हवे हे उघड आहे. सेज्ञानविषयीचा त्यांचा आक्षेप योग्य आहे. ''स्टेट'', ''ऑफ अ डेफिनिट काइंड'' आणि ''अक्वेन्टन्स'', या शब्दांसाठीचे बागड यांचे पर्याय आमच्या भाषांतरापेक्षा अधिक योग्य आहेत, हेही मान्य. पण पंधरा प्रदीर्घ प्रकरणे व सुमारे साडेतीनशे पृष्ठे व्यापणाऱ्या या ग्रंथाच्या भाषांतरातील बागडांना सापडलेले बहुतांश दोष हे त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या अज्ञानाचे निदर्शक आहेत, भाषांतरकारांच्या मर्यादांचे नाहीत. त्यामुळेच त्यांचे प्रबोधन तपशिलात जाऊन करणे भाग पडले. ■

**मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञान विभाग, आय.आय.टी., पवई, मुंबई 400 076.**

**संदर्भ :**

कॉलिंगवुड, आर.जी., १९३८. 'दि प्रिन्सिपल्झ ऑफ आर्ट'. लंडन, ऑक्सफर्ड युनिवर्सिटी प्रेस.

पाटणकर, रा.भा., १९९५. 'कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य', वाई : प्राज्ञ-पाठशाळा मंडळ.

बागड, प्रशांत, २००७. 'कॉलिंगवुडवर लादलेला मराठी अवतार'., भाषा आणि जीवन, २५:३, पृ. २४-२९.

मालशे, स.गं. आणि मिलिंद मालशे, (भाषांतर) २००४, 'कलेची मूलतत्त्वे', मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ (कॉलिंगवुड १९३८चे भाषांतर)

# ''तुका बैसला विमानीं''

विश्वनाथ खैरे

''भाषा आणि जीवन'' २५:१ हिवाळा २००७ मधल्या 'तुका बैसला विमानीं' लेखावर मला आलेल्या पत्रातले काही प्रश्न आणि त्यांची उत्तरे खाली दिली आहेत :

(१) आपटे कोशात 'विमान'चे 'अनादर, राजप्रासाद' इत्यादी अनेक अर्थ दिले आहेत. तसेच ('नम्' खाली) विमान : 'माणसां'च्या खांद्यांवर वाहिलेली उघडी पालखी' या अर्थाचे उदाहरण 'इमां विमानेन सभां विशन्ती पपौ अपाङ्गैरथ राजराजिः (श्रीहर्ष, बहुधा १२व्या शतकाच्या अखेरीस) नैषधीयचरितम् १०:१०७' अशी नोंद आहे.

'विमान' पु. नपु. ही दोन वेगळी नामे आहेत की काय ? 'मान' हे मन् आणि मा या दोन धातूंपासून साधता येते. 'विमान'चे अर्थ दोन नामांत विभागावे काय ?

'तुका बैसला विमानीं' या लेखात 'विमान' शब्दाच्या संस्कृत व्युत्पत्तीपेक्षा मराठीतल्या त्याच्या अर्थाच्या संदर्भाने विचार केला आहे. मराठीतल्या त्याच्या अर्थासाठी संस्कृत शब्दाची व्युत्पती पाहिलीच पाहिजे असे नाही; पण त्या लेखात म्हटल्याप्रमाणे, ''रामायणरचनेपासून महानुभावांच्या आणि पुढे तुकारामांच्याही काळापर्यंत 'विमान'चे दोन्ही अर्थ संदर्भानुसार प्रचारात राहिले.'' ते 'दोन्ही अर्थ', वाहन म्हणून व्यवहारात विमानाचे दोन उपयोग आहेत, त्याच्याशी संबंधित आहेत.

आपटे कोशातून उद्धृत केलेली व्युत्पत्ती, 'विमान'च्या (अनादर, अवमान) एवढ्याच अर्थाशी संबंधित आहे; प्रासाद या अर्थाशी जुळणारी नाही. हे अर्थभेद लिंगभेदामुळे होत आहेत असे नाही. त्यामुळे '' 'विमान' पु., नपु. ही दोन वेगळी नामे आहेत'' असे म्हणता येणार नाही.

आपटे कोशाच्या हिंदी आवृत्तीत (मोतीलाल बनारसीदास, १९६६) या व्युत्पत्ती पाणिनीय परिभाषेत दिल्या आहेत :

विमान : -नम् (वि + मन् + घञ्, वि + मा + ल्युट् वा)

म्हणजे 'वि + मन् + अ (उदा० त्याग)' किंवा






'वि + मा + अन (उदा० पठन)'

विमानना (वि + मन् + णिच् + युच् + टाप्) म्हणजे 'वि + मन् + प्रयोजक + कृत् प्रत्यय अन + स्त्रीवाचक आ.' यामध्ये 'वि' हा उपसर्ग आणि 'मन्' किंवा 'मा' हे धातू धरलेले आहेत. 'मन्' आणि 'मा' या धातूंचे मूळ अर्थ एकमेकांहून वेगळे आहेत. 'वि'मुळे 'मन्' किंवा 'मा' धातूंच्या उलट अर्थ साधित शब्दात येतो. 'मान'मध्ये 'मा' धातू किंवा 'मन्' चे प्रयोजक धातुरूप मानावे लागते.

'विमान'चा प्रासादवाचक अर्थ काढण्यासाठी 'मा = घडवणे ('निर् मा ण') या धातूकडे जावे लागेल. या व्युत्पत्ती मुख्यत: ध्वनींवर आधारलेल्या आहेत. असेही म्हणता येईल की 'मान' या प्रचलित शब्दाला 'वि' हा उपसर्ग लावून 'विमान' हा 'मान'च्या उलट अर्थाचा शब्द बनवला गेला.

वाहनचालक अर्थाच्या विमान शब्दात 'वि' हा नामशब्द आहे. त्याचा अर्थ 'पक्षी'. वियत् = आकाश. विहा = स्वर्ग, विहग = पक्षी. वीक, विहायस् = पक्षी, आकाश. संस्कृत कोशात नोंद असलेल्या या सर्व शब्दांमध्ये 'वि' या नामशब्दाचा (उपसर्गाचा नव्हे) अर्थसंबंध पक्षी, आकाश यांच्याशी आहे. 'वि'च्या 'माना'ने (मापाने) मोजण्याजोगे (तुलना : उपमा) वाहन ते विमान, असा अर्थ मग निष्पन्न होतो. ग्रामीण मराठीत विमानाला 'इवायिन' म्हणतात त्याच्याशी वि जुळणारा आहे (इठुबा = विठोबा).

दक्षिणी भाषांमधले शब्दही तुलनेसाठी पाहावेत :

त मानम् - आकाश; विण् - आकाश; विण्डु - आकाश, वारा (इं.विंड)

वियम् - विस्तीर्णता (एक्स्टेन्सिव्हनेस्), उंची (उन्नतता - इं.'हाइट')

आकाशात पक्ष्याप्रमाणे जाणारे ते विमान अशा कल्पनेतून विमान हा शब्द लोकभाषांत आलेला दिसतो. गरुड पक्षी हे विष्णू या देवतेचे वाहन आहे. तमिळ कोशात 'विमानवासिन्'चा अर्थ देव असा नोंदलेला आहे. आकाश-स्वर्ग हे देवांचे वसतिस्थान. त्यामुळे देवाघरी जाणारं माणूस विमानातून जाणार. म्हणून ताटीला विमान म्हणायची प्रथा पडली असावी. सामान्य माणसं मरून जातात, पुण्यपुरुष देवापाशी पोचतात अशा कल्पनेने त्यांच्या प्रेतवाहनाला विमान हे खास नाव पडले असावे.

(२) रामायणातील 'उत्तरकाण्ड' नंतरच्या काळातले तर नाही ?

उत्तररामचरिताच्या रचनेचा काळ या संदर्भात फारसा महत्त्वाचा नाही. तो कोणताही असला तरी मराठीतल्या महानुभाव साहित्याच्या काळाचा नक्कीच आधीचा आहे. संस्कृत साहित्यात 'नैषधीयचरिता'च्या पाचसातशे वर्षे आधीपासून देवांचे वाहन

या अर्थी विमान शब्दाचा उपयोग झालेला आहे. विविध कोशकारांच्या आवडीनुसार त्यांचे संदर्भ कोशांमध्ये आले आहेत.

विमानाचा उल्लेख अयोध्याकांडातही श्रवाणहत्येच्या कथेत आला आहे. तेथे श्रावण हा 'मुनिकुमार' आहे आणि त्याचे नाव दिलेले नाही. कथा अशी - ''तो धर्मवेत्ता मुनिपुत्र आपल्या कर्मांमुळे दिव्यरूपाने इंद्रासह स्वर्गाला चढला. तो इंद्रासह आपल्या वृद्ध आईबापांना म्हणाला, ''तुमची सेवा केल्यामुळे या मोठ्या स्थानाला पोचलो आहे. तुम्हीही लवकरच माझ्यापर्यंत याल.'' असे म्हणून तो जितेंद्रिय मुनिपुत्र 'वस्तुमय दिव्य विमानाने झपाट्याने स्वर्गाला चढला.' (६४.४७ ते ५०)

(३) बेळगाव-अनगोळ भागात शंभर वर्षांपूर्वी लहानपण गेलेल्यांच्या माहितीनुसार ''वीरशैवांमधे प्रेत ताटीवर निजवून नेत नाहीत, तर विमानावर बसवून नेले जाते. विमान, ताटीप्रमाणे पण चार खांबांचा डोलारा अशी रचना.'' 'तुका बैसला विमानीं' मधील 'बैसला' या पदाचा उलगडा होतो. पुण्यपुरुषाला ताटीवरून न नेता विमानावरून नेण्याची पद्धत तर नव्हती ?

वीरशैवांच्या म्हणजे लिंगायतांच्या प्रेतसंस्कारांविषयीची माहिती, 'विमान म्हणजे प्रेताचे वाहन' या अर्थाला पुष्टी देणारीच आहे. कातगडे यांच्या कन्नड-मराठी कोशात

विमान : राजगृह; गोपुर; राजवाडा; आकाशयान; अंतराळयान; लिंगायताची प्रेतवाहक तिरडी; अपमान; तिरस्कार.

या संबंधात भारतीय संस्कृती कोश खंड ८, पृ. ३७१-७२ वरील माहिती उद्बोधक आहे. लिंगायत मर्तिक प्रथा - माणूस मरण पावला की, त्याचे प्रेत आसनावर बसवतात... मृताला सुगंधलेपन करून वस्त्रालंकार घालतात. प्रेताला स्मशानात नेल्यावर सहा हात लांबीरुंदीचा खड्डा खणतात. उत्तरेकडे तोंड करून प्रेत त्यात बसवतात... प्रेत बसलेल्या स्थितीतच पुरतात...खड्डा बुजवल्यावर जंगम ठरलेले दान घेऊन खड्ड्यावर उभा राहतो व मृत इसम कैलासाला गेल्याचे जाहीर करतो.

म्हणजे, जातीच्या किंवा पंथांच्या विविधतेनुसार प्रेतवाहनांच्या ज्या अनेक पद्धती होत्या वा आहेत त्यांत 'विमानात बसवून' नेण्याचीही एक आहे. लिंगायतांमध्ये ती सर्वसाधारण आहे. तर इतर जातींत थोर माणसांपुरती. तुकारामांच्या अभंगातील 'बैसला विमानी' या वाक्प्रयोगात 'विमान म्हणजे प्रेतवाहन' हा अर्थ या सर्व पुराव्यांनी पक्का होता. त्यासाठी मराठीतला त्या शब्दाचा उपयोग विचारात घेणे पुरेसे आहे. विमान शब्दाची संस्कृत व्युत्पत्ती त्यासाठी जरुरीची नाही. ■

३७४, सिंध सोसायटी, औंध, पुणे 411 007.

प्रतिसाद

# सोस्यूर : काही तपशील

हरिश्चंद्र थोरात

मुखपृष्ठावर (अंक २५:३) पाहून आनंद झाला. अभिनंदन ! 'मुखपृष्ठासंबंधी' या शीर्षकाखाली आलेला मजकूर संदिग्ध झाला आहे. तो स्पष्ट व नेमका असता तर बरे झाले असते.

उदाहरणार्थ, पाहा - 'त्यांचे वडील निसर्गशास्त्रज्ञ होते.' म्हणजे नेमके कोण होते ? एकोणिसाव्या शतकात 'Naturalist' या शब्दामध्ये पदार्थविज्ञान तसेच रसायनविज्ञानाच्या अभ्यासकांचाही समावेश होऊ शकतो. पुढील वाक्य पाहा- 'लॅटिन, ग्रीक, संस्कृत, जर्मन, फ्रेंच इत्यादी भाषांचा जिनिव्हा येथे अभ्यास केल्यानंतर...' जिनिव्हात कोठे ? जिनिव्हा विद्यापीठात म्हणायचे आहे का ? सोस्यूरने खरोखरच जिनिव्हा विद्यापीठात पदार्थविज्ञान व रसायनविज्ञान यांचा अभ्यास करण्यासाठी प्रवेश घेतला होता. असे असले तरी तो ग्रीक व लॅटिन या भाषांच्या व्याकरणाच्या वर्गांत बसत असे. तेथे त्याने एक वर्ष घालवले.

पुढील शेवटची वाक्ये पाहा - '१८८० ते ९१ ही अकरा वर्षे त्यांनी पॅरिसमध्ये अध्यापन केले. पुढची बावीस वर्षे त्यांनी जिनिव्हात अध्यापन केले. भाषाविज्ञानाचे अध्यापन १९०६ ते १९१३ अशी एकूण सात वर्षे केले.' शेवटच्या वाक्यामुळे पॅरिसमधली अकरा आणि जिनिव्हामधील पंधरा, एकूण सव्वीस वर्षे सोस्यूर काय शिकवत होता, असा प्रश्न वाचकाच्या मनात उभा राहतो. या सव्वीस वर्षांत तो भाषाविज्ञान शिकवत नव्हता असेही वाचकाला वाटण्याची शक्यता आहे. पॅरिसच्या Ecole pratiques des hautes e'tudes मध्ये तो प्रारंभी संस्कृत, गॉथिक आणि ओल्ड हायजर्मन शिकवत होता आणि १८८७ नंतर त्याने 'इंडो-युरपियन फायलॉलॉजी' शिकवण्यास प्रारंभ केला. मला असे सुचवायचे आहे की त्याचे हे अध्यापन त्या काळच्या 'भाषाविज्ञान' या संकल्पनेत सहज बसत होते. तेव्हा पॅरिसमध्ये तो 'भाषाविज्ञान' किंवा अधिक नेमकेपणाने 'तुलनात्मक ऐतिहासिक भाषाविज्ञान' शिकवत होता, असे म्हटले तर चालेल का ?

जिनिव्हा विद्यापीठात आल्यानंतरही, म्हणजे १८९२ ते १९०६ या कालखंडात

सोस्यूरने संस्कृत आणि ऐतिहासिक भाषाविज्ञान शिकवले. ही पंधरा वर्षे तो विज्ञानच शिकवत असून 'त्याने शेवटची सात वर्षे भाषाविज्ञानाचे अध्यापन केले' या विधानामुळे गोंधळ उडतो. आयुष्याच्या शेवटच्या कालखंडामध्ये त्याने 'सैद्धान्तिक भाषाविज्ञान (जनरल लिंग्विस्टिक्स) शिकवले असा माझा समज आहे. हे कार्य त्याने मध्ये एकेक वर्षाचे अंतर ठेवून तीन शैक्षणिक वर्षे केले; सात नव्हे. 'मुखपृष्ठासंबंधी'चा मजकूर थोडक्यात लिहायचा असल्यामुळे काही तपशील स्पष्ट करता आले नसावेत असे समजतो. तथापि, या गोष्टी एवढ्याच शब्दसंख्येमध्ये सांगता आल्या असत्या, असे वाटते. ■

५०२-बी, ॲटलांटा, मिठागर रस्ता, कांदरपाडा, दहिसर (प.) मुंबई 400 068.

**प्रतिसाद**

# 'गांधीगिरी'च्या निमित्ताने

**ब्रह्मानंद देशपांडे**

**(१) आमुख**

प्रख्यात अभ्यासक श्री. म.अ. मेहेंदळे यांचे 'गांधीगिरी' या शब्दप्रयोगाविषयीचे एक पत्र दैनिक 'सकाळ' (३१ ऑक्टोबर २००६) मध्ये प्रकाशित झाले होते. ते पत्र 'भाषा आणि जीवन' (२५:१ हिवाळा, २००६, पृ.४३) मध्ये पुनर्मुद्रित झाले आहे. 'भाषा आणि जीवन'च्याच ताज्या अंकात (२५:३ पावसाळा, पृ. ६५) त्यांनी 'पुन्हा एकदा 'गांधीगिरी' या शीर्षकाखाली या शब्दाविषयी विचार मांडले आहेत.

**(२) अर्थ प्रसंगानुरूप**

श्री. मेहेंदळे यांचे विवेचनात फडके यांच्या कोणत्यातरी 'कामगिरीचा' समाचार पोतदारांनी घेतला, असे आले आहे. यातून फडके यांची ही कामगिरी पोतदारांनी 'समाचार' घ्यावा अशी होती, 'फडकेगिरी' होती आणि तिचा धुव्वा उडाला हे कळते. आता 'कामगिरी' तही 'गिरी' प्रत्यय आहेच. फडके यांची 'कामगिरी' जर समाचार घेण्यायोग्य 'फडकेगिरी' तर नामदार 'गोखले यांची इंग्लंडातील कामगिरी' ही प्रशंसापात्र कशी? (इतिहासाचार्य वि.का. राजवाडे समग्र साहित्य, खंड ७ आणि ८, पृ. ६३४)

तेव्हा कामगिरीचा अर्थ संदर्भानुसार घ्यावा लागतो हे उघड आहे.

शिवाय दत्तोपंतांनी जे केले ती दत्तोपंती, पोतदारगिरी नव्हे यातून दत्तोपंती हा प्रयोग उपहास-निदर्शक नव्हे हे सूचित होते. तर मग प्रबोधनकार केशव सीताराम ठाकरे यांनी इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांचा जो 'समाचार' 'राजवाडे यांची गागाभट्टी' म्हणून घेतला आहे तो उपहासदर्शक नाही काय ? तेव्हा शब्दांचे अर्थ प्रसंगानुरूप बदलत जातात हेच खरे.

**(३) 'गिरी' प्रत्यय**

'गिरी' हा प्रत्यय मराठी भाषेतील नाही. तो फार्शीमधून आलेला आहे. या प्रत्ययाविषयी प्रा. माधवराव पटवर्धन (१९२५:२२) लिहितात :

फार्शीत ''गर हा कर्तृवाचक प्रत्यय आहे. याला ई लागून गरी हा संयुक्त प्रत्यय सिद्ध होतो. 'गीर्' या धातुला ई लागून, घेणे या अर्थाचा गिरी फक्त कब्जगिरी, खबर्गिरी, दस्तगिरी व मुलुखगिरी या चार शब्दात दिसतो.'' यानंतर माधवरावांनी मराठीतील उदाहरणे दिली आहेत. त्यातील मुत्सद्देगिरी, दिवाणगिरी, नकसगिरी (नक्षी कोरण्याची कला), मर्दानगिरी, शिपाईगिरी आदि शब्दात 'गिरी' हा प्रत्यय उपहास, हेटाळणी दाखवित नाही, हे उघड आहे. शिपाईगिरी तर प्रशंसापात्रच. कविवर्य भा.रा. तांबे यांच्या 'डोळे हे जुल्मी गडे' या प्रख्यात गीतात ''जादुगिरी त्यात पुरी येथ उभे राहू नका,'' या ओळीतील 'जादुगिरी' पहा. यात 'गिरी' उपहास दाखवत नाहीच.

**(४) दिवाळखोर आणि दारुबाज**

यानंतर म.अ. मेहेंदळे यांनी दिवाळखोर आणि दारुबाज या शब्दांतील 'खोर' आणि 'बाज' हे 'गिरी'प्रमाणेच अनिष्ट अर्थ सुचविणारे प्रत्यय आहेत असे म्हटले आहे. पण आतिषबाज (दारूकाम उडविणारा, गोलंदाज), नजरबाज (हेर), मन्सुबेबाज (महत्त्वाकांक्षी), निशाणबाज, कायदेबाज या शब्दांत उपहास नाही. खोर - रव्वार म्हणजे खाणारा. हलालखोर - अतिशय कष्टाचे खाणारा (लक्षणेने भंगी, मेहेतर) वजिफाखोर (निवृत्तीवेतन घेणारा) यात तो उपहासाने येत नाही. जाणिवखोर. हे प्रख्यात हिंदी साहित्यिक फणीश्वरनाथ 'रेणु' यांच्या कथेचे शीर्षक. अगिनखोर म्हणजे अग्निभक्षक वा क्रांतिकारक. तेव्हा गांधीगिरी अनिष्ट नसावी. ■

'ऐतिहासिक'१४, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद 431 005.
दूरभाष : (020) 2336606 / 9890000614

**संदर्भ :**

पटवर्धन, मा.त्रिं. १९२५. फार्शी-मराठी शब्दकोश.

प्रतिसाद

# दीनानाथ आणि दिनानाथ

कृष्ण श्री. अर्जुनवाडकर

'भाषा आणि जीवन', पावसाळा २००७ या अंकात श्री. दा.ल. अडोणी यांचा लेख आहे; त्यात त्यांनी 'दीनानाथ' या शब्दाचे रूढ अर्थाने (दीनांचा नाथ) शुद्ध रूप, रामदासांच्या 'मनाच्या श्लोकां'त आहे तसे 'दिना नाथ' असे करणे योग्य ठरविले आहे. अर्थाचा विचार न करिता विशेषनाम म्हणून रूढ शब्द वापरात असण्याला लेखकाचा विरोध नाही; पण रूढ रूप अलुक् समास म्हणून चालवून घेणे लेखकाला मान्य नाही. अलुक् समासांत पूर्व पद विभक्त्यन्त नाम असते. (उदा० आत्मनेपद). विवाद्य शब्दात दीन हे विशेषण आहे.

मोरो केशव दामल्यांनी समासप्रकरणात या शब्दाची चर्चा केली आहे (अर्जुनवाडकर - संपादित प्रत, पृ. ४९०; जुनी प्रत पृ. ६०५-६). त्यांच्या मते चर्चित शब्दात 'दीना' हे 'षष्ठ्यर्थी सामान्यरूप' असल्यामुळे हा मराठीतला अलुक् षष्ठीतत्पुरुष आहे, हे कोणाला पसंत नसेल तर उक्त उदाहरणाला 'सामान्यरूप तत्पुरुष' म्हणावे, असे दामले यांचे मत आहे. 'पिशाचा हातीं' ही पृथक् पदे आहेत; आणि त्यांत 'पिशाचा' ('चा' तालव्य) हे पुढील 'हातीं' या विशेष्याच्या अपेक्षेने आलेले षष्ठ्यर्थी सामान्य रूप आहे. हा अलुक् समास असता तर त्याचे प्रथमान्त रूप (पिशाचाहात) प्रचारात उपलब्ध झाले असते. तसे रूप भाषाव्यवहारात उपलब्ध नाही. 'देव दीना घरी धावला' या प्रसिद्ध रचनेत समान परिस्थिती आहे.

निर्दिष्ट शब्दाची संगती लावण्याचा आणखी एक मार्ग आहे. संस्कृतात 'विश्वामित्र', 'विश्वावसु' यांसारखे शब्द भेटतात. यांपैकी विश्वामित्र या शब्दाच्या विवरणासाठी पाणिनीने एक स्वतंत्र सूत्र लिहिले आहे : 'मित्रे चर्षौ ।' (अष्टाध्यायी ६.३.१३०) मराठीत 'माणसागणीक, मुलखावेगळा, वारेमाप, खंडोगणती, खिसेकापू' असे शब्द भेटतात. सामान्य व्यवस्थेत ते बसविण्याचा एक मार्ग हा की 'गणिक'-सारख्या त्यांच्या उत्तर घटकांना शब्दयोगी अव्ययांत दाखल करणे. पण असे सगळेच घटक शब्दयोगी अव्ययांच्या गटात बसण्यासारखे नाहीत. पाणिनीची पद्धत मान्य असेल तर अशा शब्दांसाठी वेगळा मार्ग शोधला पाहिजे. या दिशेने विचार करिता 'दीनानाथ'

हा शब्द मुळात 'दीननाथ' (दीनांचा नाथ) असा सामासिक मानून पूर्व घटकाचे अंत्याक्षरदीर्घत्व सांगणे हा सुलभ शास्त्रमान्य उपाय आहे. (यामुळे पाणिनी मराठीच्या व्याकरणातल्या दीनांचा नाथ ठरेल !) जगन्नाथाच्या उद्धृत रचनेत (दीनानाथं पातुं) दीनानाथ हा उघडच कर्मधारय समास (दीन: च असौ अनाथ: च, तम्) आहे. त्यात कसलीच अडचण नाही. असे असामान्य बदल समासांतच होतात असे नाही. 'दारोदार, घरोघरी, वेळोवेळी' यांसारख्या द्विरुक्त शब्दांतही तुलनीय बदल होतात. संस्कृतातही 'अन्योन्य, परस्पर' यांसारखे आडवाटेने जाणारे शब्द काही कमी नाहीत. भाषा ही घटनाच दीर्घ काळ विकसित होत आलेली आणि म्हणून गुंतागुंतीची आहे.

वैयाकरणाचे काम डॉक्टरच्या कामासारखे असते. ठरावीक दुखण्यांवर ठरावीक औषधे असतात. दुखणे असाधारण स्वरूपाचे असेल तर ? त्यावर उपाययोजना करण्यात डॉक्टरच्या ज्ञानाची आणि विचारशक्तीची कसोटी लागते. ■

२, देवांगिनी, ११९२, शुक्रवार पेठ, पुणे 411 002. दूरध्वनी : (020) 24479419

**टीप :** मारुती स्तोत्रातील ''मेरुमंदार धाकुटे'' यामध्ये 'मांदार' हे नाव म्हणजे ''मंदार'' या नावातील 'द'चे दीर्घीकरणच आहे. **-लीला अर्जुनवाडकर.**

**प्रतिसाद**

# ३.७७ की ३.६७ ?

**मधुवंती सप्रे**

'भाषा आणि जीवन' दिवाळी २००६च्या अंकात ''दुर्वासशापाचे कोडे असा श्री. मा.ना. आचार्य यांचा लेख आहे. अंबरीष कथेबद्दल वेगवेगळी मतं मांडताना आचार्य यांनी गुरुचरित्राचा संदर्भ दिला आहे. संदर्भ देताना गुरुचरित्र ३.७७ म्हटलंय. पण तो संदर्भ ३.६७ (तिसरा अध्याय सदुष्टावी ओवी) असा आहे.

■

४ सिंडिकेट अपार्टमेंट, हनुमान छेदित रस्ता, पार्ले (पूर्व), मुंबई 400 057.



अनुक्रमणिका






# सुधारणांना वाव असलेली सुधारित आवृत्ती

शकुंतला क्षीरसागर

**संदर्भ :** 'संशोधकांचा वाटाड्या' अंक २५:१ हिवाळा २००७, पृ. ७२-७३.

'शोधनिबंधाची लेखनपद्धती' या पुस्तिकेची सुधारित द्वितीय आवृत्ती पाहून माझी निराशा झाली. स.गं. मालशे यांच्या पहिल्या आवृत्तीमधील चुका आणि विसंगती यांमध्ये मिलिंद मालशे यांनी संपादित केलेल्या सुधारित द्वितीय आवृत्तीमध्ये मुद्रणदोष, चुका आणि विसंगती यांची भरच पडली आहे.

दोन्ही आवृत्त्यांत प्रकाशित होणाऱ्या नियतकालिकांची नावे दिली आहेत. त्यांमध्ये 'मराठी साहित्य पत्रिका' हे एक नाव आहे. ते नाव 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' असे हवे.

**संदर्भ-सूचीच्या नमुन्यातील चुका**

पहिल्या आवृत्तीत पृष्ठ ३०वर आणि सुधारित द्वितीय आवृत्तीत पृष्ठ ५०वर संदर्भसूचीचा नमुना दिला आहे :

(१) पगडी, सेतुमाधवराव श्रीनिवास, जीवनसेतु, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे १९६९.

या नोंदीमध्ये दोन चुका आहेत. संदर्भ-सूचीतील नोंदी लेखकांच्या आडनावांच्या वर्णानुक्रमाने द्यावयाच्या असतात, म्हणून त्या नोंदींना क्रमांक देत नाहीत.

संदर्भ-सूचीतील नोंदीची सुरुवात समासालगत करतात. एका ओळीत नोंदीमधला मजकूर मावला नाही, तर दुसरी ओळ सुरू करताना समासापासून सामान्यतः तीन अक्षरांच्या जागेइतके अंतर (स्पेस) सोडून उरलेला मजकूर देतात. मालशे पितापुत्रांनी मात्र नोंद सुरू करताना समासापासून तीन अक्षरांइतके अंतर सोडले आहे आणि उरलेला मजकूर समासालगत सुरू केला आहे.

पहिल्या आवृत्तीच्या पृ. १४वर व द्वितीय आवृत्तीच्या पृ. २६वर प्रकाशनविषयक माहितीचा क्रम : स्थल, काल आणि संस्था असा दिला आहे. परंतु मालशे यांनी दिलेल्या नमुन्यात मात्र संस्था, स्थल आणि काल या क्रमाने माहिती दिली आहे. ही मोठीच विसंगती आहे.

'एम.एल.ए. हॅन्डबुक फॉर रायटर्स ऑफ रिसर्च-पेपर्स' आणि 'शिकॅगो मॅन्युअल ऑफ स्टाइल' यांनी स्थल, संस्था आणि काल हा क्रम दिला आहे. सामान्यत: सर्वत्र तो पाळला जातो. मालशे पितापुत्रांनी तो क्रम न स्वीकारण्यामागचे कारण उमगत नाही.

पहिल्या आवृत्तीच्या शेवटच्या पानावरच्या शेवटच्या वाक्यात स.गं. मालशे यांनी, ''या प्रपंचातील मूळचा माल इंग्रजी भांडारातला आहे, फक्त त्यात स्वानुभवाचा मसाला मिसळला आहे.'' असा इंग्रजी भांडारातून घेतलेल्या मालाचा मोघमपणे उल्लेख केला आहे; परंतु नव्या सुधारित द्वितीय आवृत्तीत हे संपूर्ण वाक्यच गाळून टाकले आहे !

एका दुरुस्तीबद्दल मात्र मिलिंद मालशे यांचे अभिनंदन करावयास हवे. पहिल्या आवृत्तीमध्ये, तसेच पहिल्या आवृत्तीची पुस्तिका प्रकाशित होण्यापूर्वी ती लेखनरूपाने महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या (अंक १७३, एप्रिल-जून १९७०) अंकात आली होती. त्या अंकातही ''टीपा'' आणि ''तळटीपा'' असे चुकीचे मुद्रण सर्वत्र झाले होते. सुधारित द्वितीय आवृत्तीत ''टिपा'' आणि ''तळटिपा'' असे मुद्रण करून त्या चुकीची दुरुस्ती केलेली आढळते.

सुधारित दुसऱ्या आवृत्तीमध्ये पृष्ठ ३९वर दुसऱ्या परिच्छेदात प्रबंधामध्ये अवतरणांचे प्रमाण जास्तीत जास्त किती असावे यासंबंधी मजकूर आहे. परंतु त्याची टक्केवारी सांगणारा पहिल्या आवृत्तीतील ('एक-दशांश मजकूर') हा उल्लेख तेथे दिलेला नाही. पहिल्या आवृत्तीत पृष्ठ २३वर दिलेले अवतरणाचे हे प्रमाण दुसऱ्या आवृत्तीत वगळले जाणे, हा अभ्यासकांच्या दृष्टीने मोठाच तोटा आहे.

टिपांमध्ये पृष्ठ ६२ वरच्या शेवटच्या तीन ओळी आणि पृष्ठ ६३वरच्या पहिल्या तीन ओळी पृष्ठ ६४वर पुन्हा दिल्या आहेत. हा मुद्रणदोष नसून संपादक मिलिंद मालशे यांच्या अनवधानाने निर्माण झालेला दोष आहे.

निवडक संदर्भ-सूचीमध्ये पृष्ठ ६५वर 'भाषा व साहित्य : संशोधन' (खंड दुसरा) या पुस्तकाची नोंद दोन वेळा आली आहे. एकदा जोशी, वसंत स. या संपादकांच्या नावाखाली व पुन्हा जोगळेकर गं.ना. या संपादकांच्या नावाखाली. वस्तुत: दोन संपादकांनी संपादित केलेल्या पुस्तकाची नोंद पहिल्या संपादकाच्या नावानंतर 'आणि' हा शब्द लिहून दुसऱ्या संपादकाचे नाव देतात. या नोदींचा वर्णानुक्रमाने येणारा क्रमही चुकला आहे. जोशी या नावाआधी जोगळेकर हे नाव यायला हवे. या पुस्तकाची नोंद पुढीलप्रमाणे हवी :

जोशी, वसंत स. आणि गं.ना. जोगळेकर. संपा. भाषा व साहित्य : संशोधन (खंड दुसरा). पुणे : महाराष्ट्र साहित्य परिषद, १९८५.

(३) पृष्ठ ६६वर दाते, शं.ग.(संपा.) मराठी ग्रंथसूची (१८००-१९३७) भाग १ ही दुसऱ्या ओळीतील नोंद त्याखालच्या चौथ्या ओळीत पुन्हा आली आहे. तेथे दुसऱ्या भागाची नोंद हवी होती.

**काही विसंगती**

(१) मिलिंद मालशे यांनी पृष्ठ ३०वर साधनसूचीच्या पुष्ठिकेचे उदाहरण दिले आहे. त्यातील माहितीच्या घटकांचा क्रम रूढ संकेताप्रमाणे दिला आहे. परंतु लेखकाच्या नावानंतर पूर्णविराम चिन्हाचा उपयोग केलेला नाही. अन्य विरामचिन्हांचा उपयोग रूढ संकेताप्रमाणेच आहे. परंतु हा क्रम पृष्ठ ५०वर दिलेल्या संदर्भ-सूचीतील नोंदीत, तसेच पृष्ठे ६५ ते ६७ यांवर दिलेल्या निवडक संदर्भ-सूचीतील नोंदींमध्ये अनुसरलेला दिसत नाही. त्यामुळे अभ्यासक बुचकळ्यात पडतील यात शंका नाही.

(२) मिलिंद मालशे यांनी पृष्ठ ५२वर ए.पी.ए.पद्धतीनुसार विवेचनामध्ये संदर्भांचा आधार देण्यासाठी (दामले, १९७०:६) हे उदाहरण दिले आहे. यात दोन चुका आहेत. त्यांची नोंद करण्याआधी ए.पी.ए.च्या मॅन्युअलच्या (पाचव्या आवृत्तीचे सातवे पुनर्मुद्रण अनुसार प्रकाशनवर्ष दिल्यानंतर स्वल्प-विरामचिन्ह, त्यानंतर पृष्ठ क्रमांकासाठी पृ. हा संक्षेप व पृष्ठक्रमांक देतात असे दिसून येते. परंतु मालशे यांनी प्रकाशनवर्षानंतर स्वल्पविराम न योजता द्विबिंदुचिन्ह योजले आहे. पृ. हा संक्षेप न योजता पृष्ठक्रमांक दिला आहे.

मिलिंद मालशे यांनी पृष्ठ ५२वर संदर्भ-सूचीतील नोंद दिली आहे. ती अशी आहे :

दामले, मोरो केशव (१९७०) शास्त्रीय मराठी व्याकरण (संपा. कृ.श्री. अर्जुनवाडकर) पुणे : देशमुख आणि कं.

ए.पी.ए. पद्धतीप्रमाणे संदर्भ-सूचीच्या नोंदीमध्ये लेखकाच्या आडनावानंतर लेखकाच्या स्वत:च्या व वडिलांच्या नावाची फक्त आद्याक्षरे देतात व पूर्णविरामचिन्ह योजतात. कंसामध्ये प्रकाशनवर्ष देतात. कंस पूर्ण केल्यावर पूर्णविराम देतात. पुस्तकाच्या नावानंतर पूर्णविरामचिन्ह योजतात. मालशे यांनी दिलेल्या पुस्तकाची ए.पी.ए.प्रमाणे नोंद अशी व्हायला हवी :

दामले, मो.के. (१९७०). शास्त्रीय मराठी व्याकरण, (संपा. कृ.श्री. अर्जुनवाडकर). पुणे : देशमुख आणि कं.

पृष्ठ ५३वर दिलेल्या नियतकालिकांमधील लेखाचा तसेच संपादित ग्रंथामधील लेखाचा नमुनाही चुकला आहे.

या बऱ्याचशा तांत्रिक बाबींच्या विवेचनानंतर काही अगदी साध्या बाबींसंबंधीही

लिहिणे आवश्यक वाटते.

(१) मिलिंद मालशे यांच्या लेखनात 'वर', 'वर' म्हटल्याप्रमाणे' अशी शब्दयोजना काही पृष्ठांवर आहे. परंतु त्याच्याशी संबंधित मजकूर मात्र त्या आधीच्या पृष्ठांवर आहे. उदाहरणार्थ, पृष्ठ क्रमांक २५, २६, ५१, ५५, ५७ इत्यादी. पृष्ठ २५ची सुरुवातच 'वर म्हटल्याप्रमाणे' या शब्दांनी झाली आहे. लेखन करीत असतांना हे भान सुटले असले तरी मुद्रिते तपासताना ही बाब लक्षात यायला हवी होती.

(२) त्यांनी काही इंग्रजी शब्दांचे लेखन देवनागरीत नेहमीपेक्षा वेगळे केले आहे. उदाहरणार्थ - 'ऑफ' ऐवजी 'अव्ह्'; 'रायटर्स' ऐवजी 'रायटर्झ', 'पेपर्स' ऐवजी 'पेपर्झ' इत्यादी. सर्वसामान्य मराठी वाचकांना त्याची सवय नसल्यामुळे ते खटकते.

(३) 'शिकागो मॅन्युअल ऑफ स्टाइल'संबंधी त्यांनी पृष्ठ ५२वर दिलेली माहिती त्या 'मॅन्युअल'विषयी अकारण गैरसमज निर्माण करणारी आहे. 'शिकागो मॅन्युअल' न पाहताच ती लिहिली असावी असे वाटते. मालशे यांनी 'शिकागो मॅन्युअल ऑफ स्टाइल'ची प्रेन्टिस-हॉल ऑफ इंडिया प्रा.लि. या संस्थेने १९९३ साली प्रकाशित केलेली १४वी आवृत्ती पाहिली तर त्यांना असे दिसून येईल की, तीत दोन प्रमुख लेखन-संकेतपद्धतींची सोदाहरण आणि तपशीलवार माहिती तर दिलेली आहेच; पण ग्रंथमुद्रणाच्या कामात उपयोगी पडणाऱ्या लहानमोठ्या अनेक बाबींविषयी विस्ताराने विवेचन केलेले आहे.

आत्तापर्यंतच्या विवेचनावरून या पुस्तिकेच्या सुधारित द्वितीय आवृत्तीतही सुधारणा करण्याची गरज आहे असे म्हणावे लागते.

स.गं. मालशे यांचे तात्त्विक विवेचन बिनतोड आहे. त्याबद्दल अभ्यासक त्यांचे ऋणी राहतील. ■

२९/४१८, लोकमान्यनगर, पोस्ट ऑफिसच्याजवळ, पुणे 411030.
दूरध्वनी : 24336208





अनुक्रमणिका

# अकरावी वार्षिक सर्वसाधारण सभा

रंजना फडके

मराठी अभ्यास परिषदेची अकरावी वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार, दिनांक ०५.०८.२००७ला भारत इतिहास संशोधक मंडळाच्या राजवाडे सभागृहात दुपारी ४ वाजता आयोजित करण्यात आली होती. अध्यक्षस्थानी प्रा. प्र.ना. परांजपे होते.

सभेच्या प्रारंभी अहवाल वर्षात दिवंगत झालेले परिषदेचे सभासद आ.ना. पेडणेकर, वा.के. लेले, शरच्चंद्र बडोदेकर, मो.वि. भाटवडेकर, तसेच नुकत्याच दिवंगत झालेल्या ज्येष्ठ व साक्षेपी समीक्षक डॉ. सरोजिनी वैद्य यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी दहाव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त सभागृहापुढे सादर केले. त्या इतिवृत्तास ठरावाद्वारे मान्यता देण्यात आली. ठरावाचे श्री. अ.नी. नवरे हे सूचक होते व श्री. श्रीधर देशपांडे अनुमोदक होते. याप्रसंगी कार्यवाहांनी संपूर्ण वर्षभर केलेल्या कार्यक्रमांची माहिती दिली. कार्यवृत्तास मंजुरी देण्याबाबतचा ठराव श्री. सुशील धसकटे यांनी मांडला आणि डॉ. कल्याण काळे यांनी अनुमोदन दिले.

कोषाध्यक्ष डॉ. गं.ना. जोगळेकर काही अपरिहार्य कारणांमुळे सभेस उपस्थित नसल्यामुळे उपाध्यक्ष डॉ. मृणालिनी शहा यांनी गेल्या आर्थिक वर्षाचा लेखापरीक्षित ताळेबंद व पुढील आर्थिक वर्षाचे अंदाजपत्रक सादर केले. त्याला मंजुरी देण्यासाठी श्री. श्रीधर देशपांडे यांनी ठराव मांडला आणि श्री. गो.पु. देशपांडे यांनी अनुमोदन दिले. येत्या आर्थिक वर्षासाठी लेखापरीक्षक म्हणून श्री. ए.जे. दिघे व कायदेविषयक सल्लागार म्हणून ॲड. पराग देशपांडे यांची नियुक्ती करावी, असा ठराव मांडण्यात आला. श्री. अ.नी. नवरे हे या ठरावाचे सूचक होते आणि प्रा. रंजना फडके अनुमोदक होत्या.

चाळीस मिनिटांत समाप्त होत असलेल्या सभेबद्दल मत व्यक्त करीत असताना अध्यक्ष प्रा. प्र.ना. परांजपे यांनी संमिश्र भावना व्यक्त केल्या. ते म्हणाले, ''हा आनंदयोग आहे व म्हटले तर दुःखद योग आहे. एकूणच संस्थेच्या कार्यास सर्वांची संमती व पाठिंबा आहे, असे म्हणता येते म्हणून आनंद, तर दुःख असे की एकूणच

मराठी भाषा, संस्कृती याबद्दल अधिक रस घेऊन चर्चा होत नाही.

परिषदेने रौप्यमहोत्सवी वर्ष पूर्ण केले आहे. अशावेळी परिषदेचे कार्य केवळ पुण्यातील सुशिक्षित वर्गापुरते मर्यादित न ठेवता विविध उपक्रम, प्रकल्प यांचे आयोजन करून अधिकाधिक सर्वसामान्यांपर्यंत पोचवले पाहिजे. ही परिषद ५० वर्षांच्या पुढच्या लोकांसाठी आहे, असे दृश्य दिसता कामा नये. तरुण वर्गाचा सहभाग त्यामध्ये असायला हवा, असे मत त्यांनी व्यक्त केले.

सहकार्यवाह विजया चौधरी यांनी परिषदेच्या वतीने देणगीदार, हितचिंतक या सर्वांचे आभार मानले. ■

'सायली', श्रीरंग हौसिंग सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411037. दूरध्वनी 24210985

**देणगीदारांना धन्यवाद :**

मराठी अभ्यास परिषदेकडे रौप्यमहोत्सवानिमित्त आलेल्या देणग्या पुढीलप्रमाणे आहेत :

(१) श्री. अरविंद भांडारी (अहमदाबाद) ६,०२५/- रु.
(२) प्रा. लीला पाटील (कोल्हापूर) ... ५,०००/- रु.
(३) श्रीमती विजया चौहान (मुंबई) ... ३,०००/- रु.
(४) श्री. राम द. वैद्य (पुणे) ५००/- रु.
(५) डॉ. विजया देव (पुणे) ५००/- रु.

**कार्यकारिणीत बदल**

मराठी अभ्यास परिषदेच्या सहकार्यवाह डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांनी पदाचा (व कार्यकारीमंडळ-सदस्यत्वाचाही) राजीनामा दिला. तसेच कोषाध्यक्ष डॉ. गं.ना. जोगळेकर यांचे दुःखद निधन झाले. त्यामुळे रिक्त झालेल्या पदांवर विजया चौधरी यांची कोशाध्यक्ष व सहकार्यवाह म्हणून आणि डॉ. मृणालिनी शहा यांची सहकोशाध्यक्ष म्हणून २६-०८-०७च्या कार्यकारी मंडळाच्या बैठकीत एकमताने निवड करण्यात आली.

**श्रद्धांजली**

डॉ. सरोजिनी वैद्य, मराठी अभ्यास परिषदेचे कोशाध्यक्ष डॉ. गं.ना. जोगळेकर, प्रा. श्री.पु. भागवत, वासू देशपांडे यांच्या दुःखद निधनाबद्दल कार्यकारिणीत शोक व्यक्त करण्यात आला आणि एक मिनिट स्तब्ध उभे राहून श्रद्धांजली वाहण्यात आली.

# स्वल्पविराम - 'की'च्या आधी की नंतर ?

रावसाहेब मुरलीधर काळे

**संदर्भ :** 'भाषा आणि जीवन' २४:३ पावसाळा २००७

(१) ''झाले काय की, ते उगवतीकडून चालत आले.'' (पृ. ५)

(२) ''... त्याच्याजवळ असलेल्या साहित्यप्रकाराविषयक वर्गीकरणाला हुलकावण्या देऊ लागले, की वाचकासमोर अनेक अडचणी उभ्या राहू लागतात.'' (पृ. ३०)

(३) ''मात्र हा लेख तंजावरची अशी काही ओळख करून देतो की कुठल्याही संशोधकाला तंजावरची अनिवार ओढ लागावी.'' (पृ. ४४)

पहिल्या वाक्यात स्वल्पविराम 'की' नंतर येतो. दुसऱ्या वाक्यात 'की'च्या अगोदर येतो तर तिसऱ्या वाक्यात स्वल्पविराम दिलेला नाही. बोलत असताना आपण 'की' नंतर थांबतो. जसे ''झाले काय की, ...'' म्हणून स्वल्पविराम 'की' नंतर देणे योग्य वाटते. खूप ठिकाणी 'की'च्या अगोदर दिलेला आढळतो. त्यामुळे पुढील वाचन योग्य वाटत नाही : ''..., की ते उगवतीकडून चालत आले.'' ''...., की वाचकासमोर अनेक अडचणी उभ्या राहू लागतात.'' ''..., की कुठल्याही संशोधकाला तंजावरची अनिवार ओढ लागते.

- 'पारितोषिक - वितरण आणि पुस्तक - प्रकाशन' यामध्ये प्रमुख पाहुणे म्हणून श्री. सदा डुंबरे (पृ. ७१) येतात, तर पुरस्कार श्री. सदा डुम्बरे (पृ. ७१) देतात. शेवटी भाषण श्री. डुंबरे करतात. (पृ. ७२)

अशा प्रकारे एकाच लेखात अनुस्वाराचा व पर-सवर्णांचा उपयोग/वापर चांगला वाटत नाही.

- लेखक-परिचयात काही ठिकाणी 'पीएच्.डी.' (पृ. ७२) तर काही ठिकाणी 'पीएच.डी' (पृ.७२-७३) असे लेखन आहे. मराठी साहित्य महामंडळाच्या लेखनविषयक नियमांनुसार ''इंग्रजी शब्द, पदव्या किंवा त्यांचे संक्षेप यांच्या शेवटचे अ-कारान्त अक्षर आता व्यंजनान्त (म्हणजेच पायमोडके) लिहू नये.'' उदा० एम.ए., पीएच.डी, इ० ■

मु. लोणी, पो. रिधोरा, ता. बाळापूर, जि. अकोला. पिन - 444302

**भाषा आणि जीवन २००७ : लेखनसूची**

**मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी**

'भाषा आणि जीवन'च्या इ.स. २००७ या पंचविसाव्या वर्षाच्या चार अंकांतील (अंक १ : हिवाळा, अंक २ : उन्हाळा, अंक ३ : पावसाळा, अंक ४ : दिवाळी) लेखकांची लेखक व शीर्षक सूची.

## लेखक-सूची : (नाव / अंक : पृष्ठ)

## लेखसूची-लेख : (शीर्षक / लेखक / अंक : पृष्ठ)

## पुस्तक-परीक्षणे

## सदरे

**लेखक-परिचय**

- **डॉ. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर** - जन्म १९२६. अद्वैत-वेदान्त-कोविद ही पदवी १९४१मध्ये. १९४६च्या शालान्त परीक्षेत जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती. संस्कृत विषयात एम.ए. स.प.महाविद्यालयात संस्कृतचे १८ वर्षे अध्यापन. मम्मटकृत 'काव्यप्रकाश' व मोरो केशव दामलेकृत 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथांचे सटीक, चिकित्सक संपादन. 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद', 'मराठी व्याकरणाचा इतिहास', 'मोरो केशव दामले : व्यक्ती आणि कार्य' इ.अनेक ग्रंथ प्रकाशित. साहित्यसम्राट न.चिं.केळकर पारितोषिक, पाणिनी पुरस्कार, कालिदास पुरस्कार, बेहेरे सुवर्णपदक इ० अनेक पुरस्कारांनी सन्मानित.
- **रावसाहेब मुरलीधर काळे** - एम्.ए.(मराठी). अमरावती विद्यापीठास पीएच.डी.साठी प्रबंध सादर. अकोला येथील शंकरलाल खंडेलवाल महाविद्यालयात अधिव्याख्याता.
- **डॉ. द.भि. कुलकर्णी** - पीएच.डी.(मराठी). रशियन भाषेतील पदविका, नागपूर विद्यापीठातून प्रोफेसर व विभागप्रमुख म्हणून निवृत्त. एकतीस प्रकाशित ग्रंथ. पीएच.डी. पदवीसाठी २५ विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. अनेक पारितोषिके व सन्मानांचे मानकरी.
- **सोनल कुलकर्णी-जोशी** - डेक्कन कॉलेजमधून भाषाविज्ञानात ए.ए;रेडिंग विद्यापीठातून (इंग्लंड) पीएच.डी., सध्या डेक्कन कॉलेजात भाषाविज्ञान विभागात प्रपाठक.
- **विश्वनाथ खैरे** - केंद्रीय बांधकाम खात्यातून मुख्य अभियंता म्हणून निवृत्त. संस्कृत, मराठी, तमिळ यांच्या आंतरसंबंधांचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयासंबंधी लेखन.
- **डॉ. न.म. जोशी** - एम.ए., एम.एड.,पीएच.डी.टिळक शिक्षण महाविद्यालयातून निवृत्त. ५० पुस्तकांचे लेखन. महाराष्ट्र शासनाचे उत्तम वाङ्मयनिर्मितीचे तीन पुरस्कार. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या लेखनाच्या दोन खंडांचा व अनेक सिंधी कथांचा मराठीत अनुवाद. इंग्रजी, मराठी, हिंदी व सिंधी भाषांवर प्रभुत्व. १७व्या अ.भा. बालकुमार साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. पहिल्या कोयना साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. अनेक साहित्यपुरस्कार.
- **हरिश्चंद्र थोरात** - अनेक वर्षे कीर्ती महाविद्यालयात व गेली काही वर्षे मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागात मराठीचे अध्यापन, मराठीमधील अनेक प्रतिष्ठित नियतकालिकांमधून समीक्षालेखन प्रसिद्ध. 'साहित्याचे तत्त्वज्ञान' या विषयावर पीएच.डी.साठी प्रबंधलेखन चालू. विलास सारंगांच्या काही इंग्रजी कथांचा मराठीत अनुवाद. कथा, कविता, समीक्षा इ० लेखन विविध नियतकालिकांतून प्रकाशित. दोन पुस्तके प्रकाशित.
- **डॉ. ब्रह्मानंद देशपांडे** - महामहोपाध्याय, विद्याभूषण. प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.
- **डॉ. सौ. शुभांगी पातुरकर** - 'मराठी मुक्तछंद' या विषयावर पीएच.डी. त्याच शीर्षकाचे पुस्तक १९९९मध्ये प्रकाशित. त्याला ग्रंथोत्तेजक सभा (पुणे), विदर्भ साहित्य संघ (नागपूर) यांचा म.म.वा.वि. मिराशी पुरस्कार व विदर्भ संशोधन मंडळ (नागपूर) यांचा डॉ. बाळाजी पुरस्कार असे पुरस्कार. 'मंतरलेले दिवस' (२००३) हा ललितलेखांचा संग्रह प्रकाशित.

- **डॉ. सुमन बेलवलकर** - मराठी विषयात एम.ए., पीएच.डी. (शिवाजी विद्यापीठ) सर्व परीक्षांत प्रथम क्रमांक व अनेक पारितोषिके, राष्ट्रीय शिष्यवृत्तीने सन्मानित, पश्चिम विभागीय भाषाकेंद्राच्या प्राचार्य म्हणून निवृत्त. 'बोलभाषा' व 'मराठी शारदियेच्या चंद्रकळा' (संपादित) ही पुस्तके प्रकाशित.
- **कविता भालेराव** - बी.एस्सी.बी.लिब, कोशवाङ्मय आणि विज्ञानविषयी लेखन, वैचारिक ग्रंथांची सूची तयार करण्याचे काम, 'तंत्रज्ञानाची मुळाक्षरे' या अलीकडील पुस्तकासह एकूण सहा पुस्तके प्रकाशित.
- **डॉ. अरविंद भांडारी** - गुजरात युनिवर्सिटीमधून भाषाविज्ञानाचे पीएच.डी., तेथेच भाषाविज्ञानाचे प्राध्यापक व विभागप्रमुख. प्राथमिक शालेय स्तरावरील पाठ्यपुस्तकांचे सुमारे १५ वर्षे लेखक. 'गुजराती व्याकरण' आणि 'गुजराती विभक्तिविचार' या दोन स्वतंत्र पुस्तकांचे आणि डॉ. अशोक रा. केळकर यांच्या 'प्राचीन साहित्यमीमांसा' याचे गुजराती भाषांतर प्रकाशित.
- **डॉ. मिलिंद मालशे** - आय.आय.टी.(मुंबई) येथे इंग्रजीचे प्राध्यापक. मराठी व इंग्रजीमधून लेखन. पीएच.डीचे मार्गदर्शक , परीक्षक. अनेक विद्यापीठांच्या निवड समित्या, अभ्यासमंडळे यांचे सदस्य. भाषाविज्ञान, सौंदर्यशास्त्र या विषयांचे अध्यापन. 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन'सह अनेक मराठी व इंग्रजी पुस्तके प्रकाशित. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक.
- **डॉ. ह.वि. सरदेसाई** - पुण्यातील सुप्रसिद्ध धन्वन्तरी. 'घरोघरी ज्ञानेश्वर जन्मती' इत्यादी आरोग्य व जीवनशैलीविषयक नऊ मराठी पुस्तके आणि ध्वनिफिती प्रकाशित. आरोग्यविषयक मराठीतून जाणीव जागृतीचे लेखन व व्याख्याने यांच्याद्वारे गेली अनेक वर्षे कार्य.
- **डॉ. शकुंतला क्षीरसागर** - एम.ए.,पीएच.डी.,डिप.लिब. पुणे विद्यापीठाच्या 'जयकर ग्रंथालया'तून साहाय्यक ग्रंथपाल या पदावरून सेवानिवृत्त. 'केशवसुतांच्या कवितेचा शैलीविज्ञानिक अभ्यास' या अप्रकाशित पीएच.डी. प्रबंधास मराठी अभ्यास परिषदेचा महाबँक पुरस्कार (१९९५). 'संपूर्ण केशवसुत' आणि 'श्री.के.क्षीरसागर : व्यक्ती, टीकादृष्टी आणि टीकासृष्टी' या दोन पुस्तकांचे संपादन.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-, व्यक्तीला रु. १००/-, पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **मागील अंक :** 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

(५) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु.२,५००/-, अर्धे पान रु.१,५००/-, पाव पान रु.८००/-, शुभेच्छा रु.४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

अनुक्रमणिका








निर्देशनात्म व्याकरणाचा जनक • मनोविज्ञानातील ज्ञानात्मकतावादाचा पुरस्कर्ता • अमेरिकेच्या परराष्ट्रनीतीचा टीकाकार

बुकपोस्ट - बुकपॅकेट - त्रैमासिक

R. N. I. नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३



प्रेषक

कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र.५

वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)